एकोणिसाव्या शतकाच्या सहाव्या दशकात उडियात नव्यानेच उदयाला येऊ लागलेले तीन बुद्धिवादी तरुण बालासोर येथे एकमेकांना भेटले आणि आयुष्यभराचे जीवश्च कण्ठश्च मित्र बनले. त्यापैकी प्रत्येकाने उडिया साहित्यात सर्जकतेच्या नव्या पायवाटा निर्माण केल्या. या तिघांपैकी राधानाथ राय आणि मधुसूदन राव या दोघांना इंग्रजीतून उत्तम शिक्षण तर मिळाले होतेच, त्यांची आयुष्येही सुखासमाधानाची होती. पण या त्रयीतले जे तिसरे सभासद होते – फकीरमोहन सेनापती (1843 ते 1918) – त्यांना मात्र चांगले प्राथमिक शिक्षणही मिळालेले नव्हते आणि आयुष्य ही त्यांच्याकरिता अस्तित्वासाठी चाललेली एक प्रदीर्घ लढाई होती.

उडियातील आधुनिक राष्ट्रवादाचे आणि त्या भाषेतील आधुनिक साहित्याचे जनक असलेल्या सेनापतींचे विश्वसनीय चरित्र मात्र दुर्दैवाने उपलब्ध नव्हते. डॉ. मायाधर मानसिन्हा यांनी तयार केलेली ही चरित्रपुस्तिका फकीरमोहनांची मानवी आणि वाङ्मयी मूर्ती सेनापतींनी स्वतःच्याच आत्मचरित्रातून पुरविलेल्या सामग्रीतून शक्य तितक्या तटस्थपणे उभी करण्याचा पहिलाच महत्त्वाचा प्रयत्न आहे.

फकीरमोहन सेनापतींची ही जीवनकहाणी ही पर्यायाने उडियाच्या राष्ट्रीय जीवनाच्या आणि उडिया साहित्याच्या एकोणिसाव्या शतकातील पुनरुत्थानाचीच कहाणी आहे.

उमा दादेगावकर यांनी मूळ इंग्रजीवरून केलेला हा मराठी अनुवाद ओघवत्या आणि मराठमोळ्या शैलीमुळे वाचनीय झाला आहे.

**Fakirmohan Senapati (Marathi), Rs. 40/-**

ISBN 81-260-2572-7







24 भाषांमधून पुस्तके प्रकाशित करणारी साहित्य अकादेमी
जगातील सर्वात मोठी प्रकाशन संस्था

Website : http://www.sahitya-akademi.gov.in




भारतीय साहित्याचे निर्माते

# फकीरमोहन सेनापती

मायाधर मानसिन्हा



## अनुक्रम

1

# मल्लिकाशपूरचे मल्ल

फकीरमोहन ओरिसातील ज्या पाईक–खंदायत समाजातून आले होते, त्या समाजातील लोक आजही त्यांचे पूर्वज स्वतंत्र हिंदू राजांच्या पदरी जो लढाऊ व्यवसाय करीत असत, तो व्यवसाय दर्शविणारी आडनावे मोठ्या अभिमानाने लावत असतात. खरे तर मल्ल (कुस्ती खेळणारे), सिंह भुजबळ (सशक्त बाहू असलेले), बलियारसिंह (शक्तिवानांमधील सिंह), सत्रुसाळ (शत्रूंना काट्यासारखा खुपणारा) किंवा दलबेहेरा (दलप्रमुख) वगैरे नावे आजच्या काळात फारशी शोभणारी आडनावे नव्हती तरीही!

## सेनापती

फकीरमोहन यांचे पूर्वज सुरुवातीला फक्त मल्ल होते. हे मल्ल कटक जिल्ह्यातील केंद्रपारा भागातून बालासोरा शहराच्या सीमेजवळ असलेल्या मल्लिकाशपूर येथे कसे आले आणि सेनापती कसे बनले हे पाहणे फार रंजक आहे. त्यांचा पाचवा पूर्वज हानुमल्ल हा केंद्रपारा येथे बऱ्यापैकी पैतृक मोकासा जमिनीचा मालक होता. पण काही भीषण आपत्तींमुळे त्याला ती सगळी संपत्ती सोडून परिस्थितीच्या हातचे बाहुले बनावे लागले. शिवाजीराजांचे आजोबा आणि वडील यांनी ज्याप्रमाणे अहमदनगर आणि बिजापूर येथील मुस्लिम राजांच्या पदरी चाकरी पत्करली होती त्याप्रमाणे हानुमल्लानेही आपल्या कुटुंबाला पूर्वीचे दिवस आणि प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याच्या हेतूने मराठ्यांच्या हाताखाली चाकरी मिळवली. तेथे केवळ आपल्या अंगभूत गुणांच्या जोरावर तो सर्वोच्च पदापर्यंत चढत गेला. ओरिसाच्या मराठा गव्हर्नरचा त्याने इतका विश्वास मिळवला की खूष होऊन त्याने हानुमल्ल याची बंगाल आणि ओरिसाच्या सीमावर्ती भागावरील एका महत्त्वाच्या जागेवर 'मुखत्यार' म्हणून नेमणूक केली. इतकेच नाही तर 'जनरल' किंवा 'ऑफिसर इन कमांड' अशा अर्थाची 'सेनापती' ही गौरवपूर्ण पदवीही त्याला बहाल केली. हानुमल्लाच्या पुढच्या पिढ्या त्यामुळेच मल्लिकाशपूरचे मल्ल म्हणून न ओळखले जाता 'सेनापती' म्हणून ओळखल्या जाऊ

लागल्या. अर्थात कौटुंबिक आणि धार्मिक कार्यांमध्ये मात्र आजही ही कुटुंबे आपले 'मल्ल' हे मूळ आडनाव आवर्जून वापरताना दिसतात.

### फकीरमोहन यांची आजी

कासुभट्टाची पिढी ही हानुमल्लापासूनची तिसरी पिढी होती. 1803 मध्ये जेव्हा ब्रिटिशांनी मराठ्यांकडून ओरिसाची सत्ता काबीज केली, त्याच्या थोड्या आधी या कासुभट्टाचे अकाली निधन झाले होते. त्याच्या मागे त्याची विधवा पत्नी आणि दोन छोटी मुले होती. याच विधवा कुशिलादेईचा अमीट असा ठसा फकीरमोहनांच्या आयुष्यावर उमटलेला दिसतो. त्यांच्या सर्व कलाकृतींवर तिच्या नि:स्वार्थी, देवतास्वरूप व्यक्तिमत्त्वाची गडद छाप दिसून येते. पण त्याचबरोबर याच कुशिलादेईच्या भोळसट स्वभावामुळे मुलांच्या हातून बालासोर येथली उरलीसुरली बऱ्यापैकी पैतृक जमीन कशी निसटून गेली याची हकिकतही फकीरमोहन आपल्या आत्मचरित्रात सांगताना दिसतात.

कुशिलादेईच्या दोन मुलांपैकी मोठा होता पुरुषोत्तम तर धाकटा होता लक्ष्मणचरण. त्यापैकी लक्ष्मणचरण या भाग्यवान पित्यापोटी फकीरमोहनांसारख्या हिऱ्याचा जन्म झाला. ते साल होते 1843. हे लक्ष्मणचरण पुरीच्या यात्रेहून परत येत असताना भुवनेश्वर येथे कॉलऱ्याच्या साथीमध्ये सापडले अन् अगदी तरुण वयात मृत्युमुखी पडले. त्या वेळी फकीरमोहन फक्त एक वर्ष सहा महिन्यांचे होते. पतीच्या मृत्यूच्या धक्क्याने फकीरमोहनांची आई तुलसीदेई हिने अंथरूण धरले. वर्षाच्या आतच विधवेच्या दुर्दैवी जिण्यामधून मृत्यूने तिची सुटका केली. दुर्दैवी फकीरमोहनला आता एकच आधार, एकच आसरा उरला, तो स्वत:च आधारहीन असलेल्या कुशिलादेईचा!

***

# 2

# सिंड्रेला बालक

पिढीजात जमीनजुमला गमावताच एकेकाळी धनाढ्य आणि घरंदाज म्हणून मिरवणारे मल्लिकाशपूरचे मल्ल रातोरात रस्त्यावर आले. पदरी असलेल्या दोन छोट्या मल्लांना कुशिलादेईने कसे वाढवले ते तिचे तिलाच ठाऊक! पण आलेल्या परिस्थितीला तिने निमूटपणे पण धैर्याने तोंड दिले असावे. तिने त्यांचे नुसते पालनपोषणच केले नाही तर ते वयात येताच त्यांची योग्य स्थळ शोधून लग्नेही लावून दिली. आता तिची दोन्ही मुले कर्तीसवरती होऊन परदेशी काम करीत होती, बऱ्यापैकी पैसा मिळवू लागली होती. घरात दोन दोन तरुण सुना हाताशी कामाला होत्या. वय होऊ लागलेल्या कुशिलादेईच्या खडतर जीवनातला हाच काय तो सुखाचा, आनंदाचा काळ असावा. पण हे सुखही तिच्या नशिबात फार काळ नसावे. काळाने अवचितपणे तिच्या धाकट्या मुलाला अन् सुनेला एकापाठोपाठ एक ओढून नेले. बिचाऱ्या विधवेच्या दु:खात पुत्रवियोगाच्या दु:खाची भर पडली. सदोदित आजारी असलेल्या आपल्या लाडक्या नातवंडाच्या तोंडाकडे पाहून तिने हा भयानक आघात पचवला असावा. तिच्या धाकट्या मुलाचा हा सदैव आजारी, अशक्त मुलगाच पुढे राष्ट्रीय साहित्याचे पुनरुज्जीवन करणारा फकीरमोहन सेनापती म्हणून प्रख्यात झाला.

### देवदूत

आपल्या कथा–कादंबऱ्यांमधून फकीरमोहन यांनी सूचकपणे आपल्या या अशिक्षित, साध्याभोळ्या आजीच्या आठवणी लिहिल्या आहेत. आपल्या आत्मचरित्रात त्यांनी अगदी मोकळेपणाने आपल्या आजीविषयीच्या भावना उत्कटपणे प्रकट केल्या आहेत. त्यातील भावनातिरेकाने रसिक वाचकांची मने हेलावून जातात. उच्च कोटीच्या स्त्रीत्वाचे दर्शनच त्यातून घडते.

ते लिहितात –

"माझे आईवडील वारल्यानंतर जवळजवळ सात–आठ वर्षे मी हगवण, जुलाब, मूळव्याध अशा भयानक रोगांनी त्रस्त होतो. सदासर्वकाळ मी अंथरुणावर पडून असे.

माझी आजी रात्रंदिवस माझ्या उशापायथ्याशी बसलेली असे. दिवसेन्‌दिवस, महिनोन्–महिने नव्हे, तर वर्षानुवर्षे ती तशी बसलेली मला आठवते. तहान, भूक, झोप सारे विसरून ती सतत माझ्यावर लक्ष ठेवून असे. एका बाजूला यमराज आणि दुसऱ्या बाजूला माझी आजी अशी माझ्यासाठी जणू दोघांमध्ये रस्सीखेच चालू होती. अखेर विजय माझ्या आजीचाच झाला. मी बरा होऊ लागलो.''

## ब्रजमोहन ते फकीरमोहन

''माझ्या या आजारपणात आजीने जगात असतील–नसतील त्या सर्व देवांना अन् पावू शकणाऱ्या देवतांना माझ्यासाठी साकडे घातले होते. त्या वेळी बालासोरमध्ये दोन मुसलमान पीर फार प्रसिद्ध होते. दु:खीकष्टी भक्तांच्या आर्त हाकेला ओ देऊन ते भक्तांच्या इच्छा पूर्ण करतात, अशी त्यांची ख्याती होती. बालासोरच्या आजूबाजूला असलेल्या सर्व देवतांना नवस करून झाले, पण त्यापैकी कुणीच पावत नाही असे पाहून आजीने शेवटी कळवळून या दोन मुस्लिम पिरांना साकडे घातले. 'हा मुलगा वाचला, हाती लागला तर मी त्याला फकीर करेन,' असा नवस ती बोलली. माझे खरे नाव ब्रजमोहन होते पण बरे झाल्यावर त्या दोन मुस्लिम संतांना कबूल केल्याप्रमाणे तिने माझे नाव बदलून ते अर्धे मुसलमान पद्धतीचे म्हणजे 'फकीरमोहन' असे ठेवले.

'मी बरा तर झालो, पण तिचे मातृहृदय मला तिने पिरांना कबूल केल्याप्रमाणे पूर्णपणे फकीर करायला तयार होईना. त्यातून तोडगा म्हणून तिने मला दरवर्षी मोहरममधील आठ दिवस फकीर करण्याचे ठरवले. ते आठ दिवस ती मला खऱ्या मुस्लीम फकिरासारखे वागायला लावत असे. एक घोळदार कफनी, दरवेशी टोपी, काठी आणि खांद्यावर रंगीबेरंगी झोळी असा त्या काळात माझा वेश असे. खडूची भुकटी चेहऱ्यावर फासून मी सकाळीच घराबाहेर पडे आणि बालासोरच्या गल्लीबोळातून भिक्षा मागत हिंडत असे. संध्याकाळ होता होता मी घरी परतत असे. भिक्षेमध्ये मिळालेले तांदूळ आजी विकत असे आणि त्या पैशांमधून पिरांच्या रोजच्या पूजापाठासाठी लागणारे सामान खरेदी करून त्यांना नेऊन देत असे.''

## नकोसे कार्टे

फकीरमोहनांचे वडील लक्ष्मणचरण सेनापती वारल्यानंतर आपोआपच घरातले सारे कर्तेपण त्यांचे काका पुरुषोत्तम यांच्या हाती आले होते. शिवाय ते मल्लांच्या घरातील एकमेव कमावते पुरुष होते. आपल्या कमाईमध्ये आपल्या सदैव आजारी पुतण्याला सांभाळावे लागणे, या काकांना आणि त्यांच्या पत्नीलाही मुळीच आवडत नसे. खुद्द फकीरमोहनच त्यांना डोळ्यांसमोर नकोसा होता. आपली त्याच्याबद्दलची नावड ते स्पष्टपणे दाखवत असत. तो म्हणजे आपल्या डोक्यावरचा नकोसा असलेला भार आहे याची ते त्याला पदोपदी जाणीव करून देत असत.



अशा वातावरणात फकीरमोहनच्या शिक्षणाचा कुणी विचार करणे, त्याला शाळेत घालणे शक्यच नव्हते. आजारपणामुळे मागे राहिलेल्या फकीरमोहनने मुळाक्षरे गिरवायला सुरुवात केली ती वयाच्या नवव्या वर्षी! अगदी जुन्या पद्धतीच्या पुस्तकातून त्याने शिकायला सुरुवात केली. या शिकवणीबद्दल शिक्षकांना द्यायला त्याच्याकडे पैसे नसत म्हणून त्याला शिक्षकांची वैयक्तिक सेवा करावी लागे. सगळी मुले शाळा सुटताच आनंदाने घराकडे पळत सुटत. फकीरमोहनला मात्र मागे थांबून शिक्षकांचा स्वयंपाक करणे, झाडझूड करणे, भांडी घासणे अशी कामे करावी लागत. भरीत–भर म्हणून आपल्या या पुतण्याला आपल्या मुलाप्रमाणे किंवा इतर सामान्य मुलांप्रमाणे छड्यांचा प्रसाद खावा लागत नाही याचे त्याच्या काकाला फार वैषम्य वाटे. ''छडीचा प्रसाद मिळाल्याशिवाय खरी विद्या येऊच शकत नाही,'' असा युक्तिवाद करून फकीरमोहनांच्या दुष्ट काकांनी फकीरमोहनच्या शिकवणीसाठी ते जे काही चार पैसे शिक्षकांना देत होते तेही देणे बंद करून टाकले.

शिकवणीचे पैसे मिळविण्यासाठी काकांच्या विखारी अन् विचित्र तत्त्वज्ञानापुढे मान तुकवणे बिचाऱ्या शिक्षकांना भाग पडत असे. असेच एकदा काका शाळेत आले असताना या शिक्षकांनी कोणतेही तादृश कारण नसताना केवळ काकांना समाधान वाटावे म्हणून फकीरमोहनांच्या पाठीवर दहाबारा छड्या लगावल्या होत्या. त्या वेळी वेदनांनी कळवळलेल्या फकीरमोहनांचा एकमेव आधार त्यांच्या आजीची कूस होती. नातवाची अवस्था पाहून संतापाने वेडीपिशी झालेली ती म्हातारी धावतच शिक्षकांकडे गेली अन् कडवटपणे त्यांना विचारू लागली, ''तुम्हाला स्वत:ला मुलंबाळं आहेत ना? मग दुसऱ्यांच्या मुलाला तुम्ही असं विनाकारण कसं मारू शकता?''

पण आजीच्या बोलण्याकडे कानाडोळा करून बिचाऱ्या शिक्षकाला हा तमाशा पुन:पुन्हा करावा लागत असे. काकांकडून शिकवणीचे पैसे मिळविण्याचा तोच एकमेव मार्ग त्यांच्यापुढे होता.

असे असले तरी लहानशा फकीरमोहनच्या मनातील शिकण्याची ओढ काही कमी होत नव्हती. एका शिक्षकाकडून इतका विचित्र अनुभव येत असला तरी संध्याकाळी कसेही करून तो वेळ काढत असे आणि गावातल्या दुसऱ्या एका शिक्षकाकडून पर्शियन शिकत असे. या पर्शियन भाषेवर त्यांनी पुढे चांगलेच प्रभुत्व मिळविले.

पण अभ्यासात फकीरमोहनने मिळविलेले हे छोटेसे यश देखील त्याच्या काकाकाकूच्या मत्सरी नजरेत खुपू लागले होते. त्यामुळेच त्यांनी आपल्या मुलांना ख्रिश्चन मिशनरींनी चालविलेल्या प्रतिष्ठित अशा आधुनिक प्रायमरी शाळांमध्ये घातले अन् फकीरमोहनचे शिक्षण बंद करून त्याला बालासोरच्या क्वेसाईडमध्ये रोजंदारीच्या कामाला जुंपले. फकीरमोहन त्या वेळी फक्त दहा वर्षांचा होता.

***

3

# शिक्षणाची आस बाळगणारा छोटा मजूर

हुगळी नदीच्या काठावर आज जिथे राजेशाही कलकत्ता नगर वसलेले आहे, तिथे पूर्वी डाव्या किनाऱ्यावर मजुरीसाठी येणाऱ्या लोकांसाठीच्या मातीच्या झोपड्या होत्या. त्याच्याही पूर्वी तिथे अतिशय चलती असलेल्या बालासोर बंदराचा धक्का होता.

फकीरमोहन यांनी आपल्या आत्मचरित्रात या भरभराटीच्या काळातील बंदराचे जे वर्णन केले आहे, ते परिकथेतील वाटावे इतके अद्भुत आणि आठवणीत राहणारे आहे. त्यांनी स्वत: तेथे बालपणापासून काम केलेले असल्याने तिथला अगदी कोपरान्कोपरा त्यांच्या चांगल्या परिचयाचा होता.

ओरिया लोकांना अतिशय अभिमान वाटाव्या अशा गतकालातील वैभव दर्शविणाऱ्या, समुद्री तुफानांना आणि भयंकर लाटांना तोंड देत केलेल्या समुद्र–प्रवासाच्या, सागरी व्यापाराच्या अनेक कथा फकीरमोहनांनी लिहिल्या आहेत. अशा कथा लिहिणारे ते पहिले आणि एकमेव उडिया लेखक होते. या कथांना त्यांनी बालासोर येथे बालमजुरी करण्यात घालविलेल्या काळाची पार्श्वभूमी असणे साहजिकच होते. त्यांना त्यांच्या त्या वेळच्या नजरेतून दिसणाऱ्या बंदराचे वर्णन त्यांनी आत्मचरित्रात केलेले आहे –

"माझ्या लहानपणी बालासोर हा अतिशय चलती असलेला, सतत गजबजलेला असा धक्का होता. जवळजवळ पाचशे ते सहाशे जहाजे तिथे येत–जात असत. त्यापैकी बहुतेकांमध्ये मीठ असे. इतर मालांत ग्राहकोपयोगी वस्तू असत. रंगून, मद्रास, कोलंबो अशा दूरदूरच्या बंदरांकडे किंवा हिंद–महासागरातील वेगवेगळ्या बेटांकडे त्या वाहून नेल्या जात असत. ते शीडवाल्या जहाजांचे दिवस होते. स्टीमरचे नावही तोपर्यंत कुणाच्या ऐकिवात नव्हते. जहाज ज्या प्रकारचे असेल त्या प्रकारे सहा ते वीस वेगवेगळ्या प्रकारांची–आकारांची शिडे त्याला लागत असत. काही शिडे त्रिकोणी, काही आयाताकार तर काही वेड्यावाकड्या आकाराचीही असत. शिडे जर मापापेक्षा मोठी असली तर वादळात जहाज उलटण्याचा धोका असे. शिडे जर मापापेक्षा लहान असली तर जहाज पुढेच सरकत नसे. नवशिके मात्र मापांच्या बाबतीत हमखास घोडचुका करीत. माझे वडील आणि काका पोट भरण्यासाठी जहाज



कॉन्ट्रॅक्टरचा व्यवसाय करत असत. त्या वेळचे बहुतेक सर्व धनाढ्य व्यापारी शिडांसाठी लागणारे कॅनव्हास कॉन्ट्रॅक्टरकडूनच विकत घेत असत. मला आठवते, माझ्या लहानपणी शेकडो शिंपी आमच्या घरी बसून फक्त शिडांसाठी कॅनव्हास कापण्याचे अन् शिवण्याचे काम करीत असत. अतिशय बरकतीचा असा तो धंदा होता."

## लवणजलातील हिरकण्या

पण फकीरमोहन ज्या काळात धक्क्यावर बालमजूर म्हणून काम करू लागला तो काळ बंदराच्या वैभवाचा उतरता काळ होता. म्हणूनच त्यांच्या व्यवहारी काकांनी त्याला मिठावरील जकात गोळा करण्याच्या खात्यात चिकटवले होते.

बंदर बंद झाल्यामुळे एकेकाळी भरभराटीत असलेले आपले जन्मगाव अशा विपन्नावस्थेला येऊन पोहोचले याचे फकीरमोहनना फार वाईट वाटत असे. पुढील आयुष्यात अनेकवेळा त्यांनी याबद्दल हळहळ व्यक्त केलेली दिसते. आपल्या आत्मचरित्रात ते म्हणतात –

"फक्त भारतातच नव्हे तर संपूर्ण युरोपात बालासोरचे नाव खुले बंदर किंवा खुली उतारपेठ म्हणून प्रसिद्ध होते. बंगालमध्ये पाय रोवण्याच्याही पूर्वी डच आणि डॅनिश तसेच फ्रेंच आणि ब्रिटिश व्यापाऱ्यांनी आपल्या पेठा बालासोरमध्ये उघडल्या होत्या. पण माणसांच्या नशिबात जसे चढउतार असतात तसे शहरांच्याही भाग्यात असतात हे बालासोरने अगदी पूर्णपणे खरे करून दाखविले. एकेकाळी जो नदीचा काठ हजारो लोकांच्या वावरण्याने, बोलण्याने सतत गजबजलेला असे, तिथे आता अगदी स्मशानवत् शांतता पसरलेली दिसते. वेड्यावाकड्या वाढलेल्या झुडपांचे जंगल आता तिथे पसरले आहे. माणसांची चाहूल तर औषधालाही लागत नाही. नदीच्या पात्रात फक्त वाळू आणि गाळ भरला आहे. जुने धनाढ्य व्यापारी आणि जहाजमालक आता राहिले नाहीत. बालासोरचा सगळा आतला आणि बाहेरचा व्यापार आता परकीयांच्या हाती गेला आहे."

बालासोरहून निर्यात होणाऱ्या तांदूळ, कापड या मालापेक्षा मीठ हा अधिक मौल्यवान असा निर्यातीचा माल होता असे दिसते. फकीरमोहन म्हणतात – "बालासोरला जी भरभराट आली होती ती केवळ मिठामुळेच आली होती. बालासोरच्या उत्तरेकडे असलेल्या सुवर्णरेखा नदीच्या मुखापासून ते खाली दक्षिणेकडे असलेल्या धामराला येथील महानदीपर्यंत संपूर्ण किनाऱ्यावर प्रचंड प्रमाणात मीठ तयार केले जाई. बंगालच्या खेड्यापाड्यातील लोकांना फक्त बालासोरचेच मीठ ठाऊक होते. मिठावरील सरकारी जकात विभागावर बालासोरमधील लोकांची उपजीविका अवलंबून होती असे म्हणायला हरकत नाही."

## मिठावरील सरकारी एकाधिकार

पण मीठ–निर्यातीच्या जोरावर हे वैभव उपभोगणे लोकांच्या नशिबात फार काळ नव्हते. फकीरमोहनना त्याबद्दल साहजिकच वाईट वाटते. ते म्हणतात – "फक्त बालासोरच्याच नव्हे तर अवघ्या ओरिसाच्या नशिबातील तो दुर्दैवी दिवस लवकरच उगवला. मीठ तयार करण्यावरील बंदी हुकूम लागू झाला. त्याचबरोबर त्याच्याशी संबंधित अशी सगळी खातीही बरखास्त करण्यात आली. भाग्यलक्ष्मीने ओरिसाकडे पाठ फिरवली आणि ती इंग्लंडमधील लिव्हरपूल किंवा अन्यत्र कुठेतरी वास करायला निघून गेली."

फकीरमोहनांच्या देशभक्तीने भारलेल्या अंत:करणात आपल्या गावाच्या किंवा अवघ्या ओरिसाच्या नशिबी आलेल्या या दुर्दैवी घटनेचा सल सतत बोचत राहिलेला दिसतो. पुढे 1907 मध्ये त्यांनी विस्मृतीत गेलेल्या या मीठ तयार करणाऱ्या लोकांविषयी एक हेलावून टाकणारा लेख लिहिला. त्या वेळी ते 65 वर्षांचे होते. मीठ तयार करण्यावरील बंदीमुळे लोकांची कशी विपन्नावस्था झाली होती याचे वर्णन त्यात होते. त्याचबरोबर ही बंदी आली नसती तर आपले शहर कसे वैभवाच्या शिखरावर पोहोचले असते त्याचे अचूक दिग्दर्शनही त्यांनी केले होते. महात्मा गांधींच्या स्वातंत्र्यलढ्यात मीठ हे माणसाच्या मूलभूत अधिकाराचे प्रतीक बनले होते. पण त्याच्या जवळजवळ पन्नास वर्षे आधी फकीरमोहनांनी मीठनिर्मितीच्या धंद्याच्या पुनरुज्जीवनासाठी आपला एकाकी आवाज उठवला होता.

"पूर्वीच्या काळी माझ्या देशबांधवांनी मिठाच्या बदल्यात सोने मिळवले होते. आता मात्र ते आपल्याजवळचे सोने कवडीमोलाच्या पाश्चात्त्य वस्तूंसाठी खर्च करत आहेत. मी पूर्वी म्हटल्याप्रमाणे एकट्या बालासोर जिल्ह्यात जवळजवळ 9 लाख मण मीठ तयार होत असे. मीठ निर्माण करण्याचा उद्योग तसाच चालू राहिला असता तर आज ते उत्पन्न कमीत कमी २० लाख मण तरी नक्कीच झाले असते. त्यामुळे त्याने जिल्ह्याला वर्षाला १० लाख रुपयांचे उत्पन्न निश्चितपणे मिळवून दिले असते आणि ओरिसाच्या कैवर्तांनी (दर्यावर्दी केकटा जमात) नवीन नाविक पद्धतीचा वापर सुरू केला असता तर या मिठाच्या व्यापारात त्यांना त्याहूनही कितीतरी अधिक फायदा झाला असता.

"आज बालासोरचे जे वैभव आपल्याला दिसते, तो फक्त बाह्य देखावा आहे. या वैभवामागची सगळी सूत्रे, सगळे लगाम परदेशी लोकांच्या हातात आहेत. फक्त व्यापारीच नाही तर वेगवेगळ्या सरकारी ऑफिसेसमधील अधिकारी देखील परकीय आहेत. ओरिसामधून धावणाऱ्या रेल्वेसारख्या खात्यात आज एकाही स्थानिक माणसाला नोकरी मिळू शकत नाही. आज उडिया लोक उपजीविकेसाठी फक्त शेतीवर अवलंबून आहेत. पण शेतीसाठी पुरेशी लागवडीची जमीन तरी कुठे शिल्लक आहे? देवा, तू या पाषाणहृदयी सरकारच्या हृदयाला भूतदयेचा पाझर फोडून त्याला आमचा तो मूळचा एतद्देशीय मीठ तयार करण्याचा व्यवसाय पुन्हा सुरू करण्याची बुद्धी का देत नाहीस?"



## ज्ञानाच्या शोधातील एक अस्वस्थ आत्मा

युगप्रवर्तक म्हणाव्या अशा त्या काळात आपला छोटा, अर्धनग्न अवस्थेतला दु:खी बालमजूर फकीरमोहन मजुरी करता करता मिळेल त्या ठिकाणाहून ज्ञानाचे कण आपल्या कोवळ्या मुठीत गोळा करण्याचे प्रयत्न करत होता. काकाने मीठ विभागातील नोकरीवर त्याला शिकाऊ कामगार म्हणून चिकटवल्यावर वेळ मिळेल तसा आणि तेव्हा तो वेगवेगळ्या शिक्षकांकडून थोडी थोडी बंगाली, पर्शियन आणि संस्कृत भाषा शिकू लागला. सतत काहीतरी नवीन शिकण्याची त्याची ही ऊर्मी पुढे आयुष्यभर टिकून राहिली. आज आंध्र प्रदेशातील श्रीकाकुलम जिल्ह्यात असलेल्या टेक्काली येथे काही काळ त्यांचे वास्तव्य होते. तेवढ्या वेळातही त्यांनी काही तेलुगू पंडितांकडून तेलुगू भाषा शिकून घेतली होती. अन् त्या वेळी त्यांचे वय होते पंचावन्नपेक्षाही जास्त! त्यांनी इंग्रजी भाषेवर मिळविलेलेले प्रभुत्व हा तर एक बौद्धिक चमत्कारच म्हणावा लागेल. वयाच्या तेविसाव्या वर्षापर्यंत त्यांना इंग्रजीचे ए, बी, सी, डीसुद्धा येत नव्हते, अन् त्या वेळी ते बालासोर येथील मिशन स्कूलमध्ये मुख्य पंडित म्हणून कामालाही लागले होते. इंग्लिश न जाणणाऱ्या देशी पंडितांमध्ये ते आधीच बालासोरचे विद्वान म्हणून प्रसिद्ध होते. इतकेच नाही तर आपल्या बुद्धिसामर्थ्याने त्यांनी पाश्चात्त्य पंडितांमध्येही आदराचे स्थान मिळवले होते. एकदा एका युरोपियन आर्डलींने त्यांना डिवचले अन् त्यांनी जिद्दीने तात्काळ राजभाषा इंग्रजी शिकायला सुरुवात केली.

एकदा ज्ञानाच्या मार्गावर प्रवेश केल्यानंतर त्यांच्यासारख्या कुशाग्र बुद्धीच्या व्यक्तीला कुठलेही नवीन ज्ञान अवगत करून घेणे कठीण वाटेनासे झाले. केवळ एका डिक्शनरीच्या मदतीने त्यांनी अरेबियन नाईटस्, रॉबिन्सन क्रूसो, लालबिहारी डे यांचे पिझन्टलाईन, इंग्लिश बायबल इत्यादी ग्रंथ वाचून काढले होते. ते शिकले ते इंग्लिश बस्स एवढेच होते. पण त्याच्या जोरावर त्यांनी इंग्रजी भाषेचा जो अभ्यास केला होता तो इतका सखोल आणि व्यापक होता की, त्या बळावर त्यांनी आपल्या नोकरीतच नव्हे तर सार्वजनिक आयुष्यातही एक गौरवाचे असे अढळ स्थान मिळवले होते.

## शिक्षणातील दुसरे साहस

बालासोरचा मीठ विभाग बंद पडला तेव्हा फकीरमोहन 15 वर्षांचे होते. त्यांच्याविषयी कुणालाच काहीही वाटत नव्हते. विभागातील बहुसंख्य लोक बंगाली होते. ते बंगालमध्ये निघून गेले. तिथल्या वेगवेगळ्या सरकारी ऑफिसेसमध्ये त्यांना

सामावून घेण्यात आले. स्थानिक कर्मचारी मात्र दीर्घकाळ ऑफिसच्या रिकाम्या आवारात चकरा मारत राहिले. पण याच अर्थशून्य भटकण्यात फकीरमोहनच्या मनात स्वत:च्या अस्तित्वाबद्दलच्या, अस्मितेबद्दलच्या विचारांचे बी रुजले असावे. त्यातून अखेर या दुर्लक्षित, पोरक्या पोराने आयुष्यात पहिल्यांदाच स्वत:च्या मनाने काहीतरी करण्याचा निश्चय केला. आजवर मिळेल त्या मार्गाने प्राप्त केलेल्या ज्ञानाला त्यांनी आता नियमित शालेय शिक्षणाची जोड देण्याचे ठरवले.

कुणालाही, अगदी आपल्या आजीलाही न सांगता फकीरमोहनने बालासोरजवळच्या बाराबती येथील मिशन स्कूलमध्ये नाव घातले. त्या वेळी ते जवळजवळ अर्धनग्न अशा अवस्थेत वावरत असत. पूर्ण अंग झाकणारा सदरासुद्धा त्यांना मिळत नसे. त्याच वेळी त्यांचा चुलतभाऊ नित्यानंद मात्र सॅटीनचे महागडे कपडे घालून शाळेत मिरवत असे. फकीरमोहनविषयीचा विखारी दुष्टावा आणि असूया त्याच्या या कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीच्या मनात इतकी खोलवर रुतलेली होती की संध्याकाळी अभ्यास करायच्या वेळी नित्यानंद त्याला आपल्या कंदिलाच्या प्रकाशातसुद्धा बसू देत नसे.

पण अशा विपरीत परिस्थितीत अभ्यास करतानादेखील फकीरमोहन आनंदी असत. इतिहास, भूगोल, गणित अशा नवनवीन विषयांची ओळख करून घेताना, तरुण कीट्सने प्रथमत: जेव्हा चॅपमनचा होमर वाचला तेव्हा त्याला जसा आनंद झाला होता तसा आनंद त्यांना होत असे. फकीरमोहनच्या नम्र स्वभावावर, त्याच्या प्रामाणिकपणावर आणि कुशाग्र बुद्धीवर सगळेच शिक्षक फार खूश असत. शाळेची मासिक फी फक्त चार आणे (25 पैसे) होती, मात्र या हुशार पण दुर्दैवी मुलाला ती फी देणे देखील शक्य नव्हते. महिनोन्‌महिने फी साचत जात असे. हेडमास्तरांचे तगादे आणि आजीच्या विनवण्यांना बघून कधीतरी काकांनी आपल्या इच्छेविरुद्ध त्याची पहिल्या वर्षीची फी भरली होती. दुसऱ्या वर्षी मात्र त्यांनी फी भरण्यास नम्रपणे नकार दिला. सहा महिने सतत असा लढा दिल्यावर फकीरमोहन थकले. निराशा आणि त्रागा यातून त्यांनी आपली हार पत्करली.

## शिक्षणाची समाप्ती

ज्या व्यक्तीने पुढच्या काळात आपल्या गावाचे नव्हे राज्याचे नाव उंचावले, त्या व्यक्तीला शाळेची महिन्याची चार आणे फी जमा करता येऊ नये आणि आपले प्राथमिक शिक्षणदेखील पूर्ण करता येऊ नये, ही नियतीची केवढी क्रूर चेष्टा आहे बघा!

या प्रसंगाने आपल्या महत्त्वाकांक्षी नातवाच्या मनात निर्माण झालेला कडवटपणा, निराशा त्याच्या प्रेमळ आणि दक्ष आजीच्या नजरेतून सुटली नाही. पण ती तरी काय करणार? तिने फक्त सांत्वनाचे अन् धीराचे चार शब्द त्याला सांगितले. ती म्हणाली,



"शिक्षणाची एवढी काळजी का करतोस तू बेटा? काही काळजी करू नकोस. अरे, तू पुढे इतका पैसा कमावशील की बघतच राहशील!"

आजीच्या निर्मळ मनातून आणि निखळ प्रेमातून निघालेले हे उद्‌गार लवकरच देववाणी ठरले!

***

## 4

# शिक्षक, लेखक आणि प्रकाशक

शाळेची महिन्याची चार आणे फीही देऊ न शकल्याने फकीरमोहनची शाळा बंद झाली. बिचाऱ्याला पुढे काय करावे ते सुचेना. मत्सरी आणि दुष्ट काकाकाकूंमुळे घरही त्याला नरकपुरी वाटत असे. सुदैवाने ही परिस्थिती फार काळ टिकली नाही. तो ज्या शाळेत होता त्या शाळेत शिक्षकाची एक जागा रिकामी झाली आणि तेथील हेडमास्तरांनी फकीरमोहनजवळ आवश्यक ती सर्टिफिकेटस् नसतानाही त्याच्या कुशाग्र बुद्धीवर विसंबून त्याची निवड त्या जागेसाठी केली. फकीरमोहनना अडीच रुपये महिना पगार मिळू लागला. आजच्या महागाईच्या काळात ही रक्कम अगदी क्षुल्लक वाटत असली तरी त्या काळात ती फार मोठी वाटत असे. फकीरमोहनच्या आजीला तर लाडक्या नातवाला नोकरी लागलेली पाहून अस्मान ठेंगणे वाटू लागले होते.

### देशभक्त प्रकाशक

बाराबती शाळेचे व्यवस्थापक फकीरमोहनांच्या शिकविण्यावर इतके खूष झाले की लवकरच त्यांनी त्यांचा पगार अडीच रुपयांवरून चार रुपये केला. त्या वेळी एका पैशाची किंमत आजच्या दहा रुपयांएवढी होती. त्यामुळे ही पगारवाढ भरघोस होती असेच म्हणावे लागेल.

सुरुवातीपासूनच फकीरमोहन मुलांचे प्रेरणास्थान ठरले होते. शिक्षक म्हणूनही त्यांचा मुलांवर चांगला प्रभाव होता. भूगोल शिकविताना हवे ते नकाशे सहजासहजी मिळत नसल्याने ते स्वत: नकाशे तयार करत असत. अंकगणित, बीजगणित आणि त्रिमिती या विषयांची तयारी त्यांनी स्वत:ची स्वत:च केली होती. कारण आपल्या जीवनात हे विषय ते कधीच शिकले नव्हते अन् बालासोरमध्ये अशी कुणी व्यक्तीही नव्हती जिच्याकडून ते हे विषय शिकू शकले असते. बाकी साहित्य आणि विशेषत: इतिहास शिकविण्यात मात्र त्यांचा हात धरणारा कुणी नव्हता. कधी काळी बालमजूर असलेला हा मुलगा बघता बघता गणित आणि साहित्य यासारख्या दोन टोकांच्या



विषयात पारंगत होऊन एक अतिकुशाग्र बुद्धिमत्तेचा शिक्षक म्हणून पुढे आला हा जणू एखादा ईश्वरी चमत्कारच होता.

### त्यांचे युरोपियन मित्र

एक यशस्वी अन् कुशल शिक्षक म्हणून त्यांचे नाव इतके गाजले होते की बालासोर येथील एकमेव प्रतिष्ठित अशी जी ख्रिश्चन मिशनरी शाळा होती तेथील मुख्याध्यापकांची जागा रिकामी होताच तेथील मिशनरी अधिकाऱ्यांनी काहीही विचार न करता फकीरमोहनना त्या पदासाठी पाचारण केले. त्या प्रतिष्ठित पदासाठी त्यांनी फकीरमोहनना महिना दहा रुपये पगार देऊ केला.

फकीरमोहनननी पुढील आयुष्यात जी उंच झेप घेतली त्यासाठी हा बदल म्हणजे मजबूत आधार ठरला. याच काळात ते युरोपियन ऑफिशियल्स आणि युरोपियन मिशनरीज यांच्या निकट सहवासात आले. त्यांच्यामध्येही सर्वांत महत्त्वाचे होते ते शाळेचे सेक्रेटरी रेव्ह. ई. सी. बी. हालेम आणि डिस्ट्रिक्ट कलेक्टर श्री. जॉन बीम्स! यापैकी मि. बीम्स यांनी 'Comparative Grammar of Indian Languages' हा महत्त्वाचा ग्रंथ लिहून एक थोर भाषापंडित म्हणून नाव कमावले होते. ते फक्त विद्वान अभ्यासकच नव्हते तर कुशल प्रशासकही होते. 'Memories of a Bengal Civilian' या त्यांच्या नुकत्याच प्रकाशित झालेल्या आत्मचरित्रामध्ये त्यांनी गेल्या शतकातील भारतीय समाज आणि प्रशासन यांच्यामधील अनेक अंधाऱ्या जागांवर झगझगीत प्रकाश टाकला आहे.

### फकीरमोहन आणि बीम्स

बालासोरला डिस्ट्रिक्ट कलेक्टर म्हणून नेमणूक होताच बीम्स यांनी ओरिया भाषा शिकविणारा कुणी भेटतो का, याचा शोध घ्यायला सुरुवात केली. ओरिया भाषेच्या इतर भगिनी असलेल्या बंगाली, असामी आणि हिंदी भाषा त्यांना आधीच अवगत होत्या. त्यामुळे आता त्यांना फक्त ओरिया भाषेत पारंगत असणारा शिक्षक नको होता तर बंगाली आणि संस्कृतमध्येही पारंगत असणारा शिक्षक हवा होता. रेव्हरंड हालेम यांनी त्यांना या आगळ्या आणि अवघड कामासाठी लगेच फकीरमोहन यांचे नाव सुचवले.

हे सगळे कसे घडले असावे हे जाणून घेण्याची उत्सुकता असलेल्या वाचकांना ते फकीरमोहनांच्या स्वत:च्या शब्दांत वाचणे नक्कीच आवडेल. ते लिहितात –

"ब्रिटिश सिव्हिलियन्समध्येच नाही तर भारतीय विद्वानांमध्येही जॉन बीम्स हे अतिशय बुद्धिमान अन् उच्च दर्जाचे अभ्यासक म्हणून प्रसिद्ध होते. त्यांना अकरापेक्षाही जास्त भाषा अवगत होत्या. बालासोरला आले तेव्हा ते आपल्या 'Comparative Grammar' या ग्रंथाच्या लेखनात व्यग्र होते. आमचे सेक्रेटरी रेव्ह. हालेम हेही

साहित्यात रस घेणारे अभ्यासक होते. या समान गुणामुळे त्या दोघांची मैत्री जमून यायला वेळ लागला नाही. बीम्सना ओरिया, बंगालीसोबत संस्कृतही जाणणाऱ्या पंडिताची गरज आहे हे समजताच माझे हितचिंतक या नात्याने रेव्ह. हालेम मला आपल्यासोबत घेऊन गेले अन् माझी श्री. बीम्स यांच्याशी गाठ घालून दिली. पहिल्याच भेटीत त्यांनी मला संस्कृत प्रत्यय आणि शब्दयोगी अव्यय यांच्या उपयोगांबाबत काही प्रश्न विचारले. मी दिलेल्या उत्तरांनी त्यांचे समाधान झाले असावे. कारण त्यांनी लगेच ते आपल्या 'Comparative Grammar' या पुस्तकात समाविष्ट करण्यासाठी लिहून घेतले. या एकाच घटनेने मला बालासोरमधील युरोपियन लोकांमध्ये श्रेष्ठ भारतीय विद्वान म्हणून नाव मिळवून दिले.

"मी त्यांना आठवड्यातून कमीत कमी एकदा तरी भेटावे, अशी विनंती बीम्सनी मला केली. आम्ही दोघेही या भेटीची सारख्याच उत्कंठेने वाट पाहत असू. चुकून जरी एखादा दिवस मागेपुढे झाला तरी ते मृदू आवाजात विचारत, "बाबू, अरे इतका उशीर का लावलास?" आमची सर्व चर्चा भाषांविषयीची असे. त्यात कठीण अशा चतुष्पदींपासून, साप उतरविण्याचे मंत्र ते त्या काळातील प्रचलित जादूटोण्यापर्यंत आणि ओरियातील 'रसकल्लोळा'सारख्या साहित्यशास्त्रविषयक अभिजात ग्रंथांपर्यंतचे विषय असत.

"ब्रिटिशांशी असलेल्या माझ्या या संबंधांचा आणि त्यांच्या मनात माझ्याविषयी असलेल्या आदरभावनेचा मला माझ्या कार्यालयीन कामांमध्ये फार उपयोग झाला. कलेक्टर ऑफिसमधले छोटे-मोठे लोक तर सोडाच पण सर्वच मोठे बंगाली अधिकारी देखील माझ्याशी वेगळ्याच अदबीने, विशिष्ट अंतर ठेवून वागू लागले होते.

"बालासोर येथे मी जे स्त्री-शिक्षणाच्या प्रसाराचे काम करीत होतो, त्या कामात आणि ओरिया भाषेच्या विकासाच्या प्रयत्नात बीम्स मला नेहमीच सक्रिय पाठिंबा आणि प्रोत्साहन देत असत. माझ्या व्यक्तिगत आयुष्यात आलेल्या प्रत्येक अडचणीच्या प्रसंगात त्यांनी मला मदतीचा हात दिला होता. काही कठीण प्रसंगांमधून तर त्यांनी मला अक्षरश: तारून नेले होते. एका शब्दात सांगायचे तर ते माझ्या जीवनाचा आधार होते अन् माझे सर्वांत मोठे कल्याणकर्ते होते.

"आजवर मी जे काही मिळविले त्यात बीम्सचा सिंहाचा वाटा आहे. माझ्या अखेरच्या श्वासापर्यंत मी त्यांच्या ऋणात राहणे पसंत करीन. आजही मी जेव्हा सकाळ-संध्याकाळ भगवंतापुढे हात जोडतो तेव्हा 'त्यांच्या आत्म्याला शांती मिळो' अशी कामना नक्कीच करतो. मला इथे सांगायला अतिशय संकोच वाटतो पण त्या काळात बीम्स आपल्या मित्रांमध्ये माझी वाखाणणी 'एक देशभक्त पंडित' अशी करत असत."



### बालमजूर पुस्तक लिहितो

बालासोर येथील मिशन स्कूलमध्ये मुख्याध्यापक म्हणून काम करत असतानाच फकीरमोहनांची युरोपियन लोकांमध्येच नाही तर आजूबाजूच्या प्रांतांमधील ओरिया बोलणाऱ्या लोकांमध्येही नवोदित देशभक्त, लेखक आणि विद्वान म्हणून ख्याती पसरू लागली होती. त्यांच्या कुशल मार्गदर्शनाखाली त्यांच्या शाळेतील मुले वर्षानुवर्षे सर्वाधिक राज्य शिष्यवृत्त्या मिळवत होती. इतकेच नाही तर फक्त जुजबी प्राथमिक शिक्षण घेतलेल्या अन् केवळ मजुरीचा अनुभव गाठी असलेल्या या तरुण शिक्षकाने ओरिया भाषेत गणित, भूगोल, भारतीय इतिहास आणि त्रिमिती (ट्रिग्नोमेट्री) या विषयांची जी पाठ्यपुस्तके लिहिली होती, त्यांना सरकारकडून बक्षिसेदेखील मिळाली होती. या पहिल्याच यशस्वी कामगिरीमुळे फकीरमोहनांची कीर्ती बालासोरच्या सीमा ओलांडून ओरिया बोलणाऱ्या दूरदूरच्या लोकांपर्यंत पोचली. पुढील काळात त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले, पण या पाठ्यपुस्तकांच्या लेखनामधूनही त्यांच्या सखोल अभ्यासाचा, विषय मांडण्याच्या अचूक पद्धतीचा लोकांना प्रत्यय आला होता. लेखक म्हणून त्यांचा प्रभाव तेव्हाच लोकांवर पडला होता. कारण फकीरमोहन लोक आणि लोकांची भाषा नेहमी विचारात घ्यायचे.

आपल्या पुस्तकांना मिळालेल्या यशावर स्वत: फकीरमोहनांचाही कधीकधी विश्वास बसत नसे. फक्त वर्षादीड वर्षाच्या शालेय शिक्षणाच्या बळावर एखादा मजूर लेखक होण्याची स्वप्ने तरी पाहू शकतो का? पण एक यशस्वी शिक्षक म्हणून कमावलेले नाव, एक अभ्यासक म्हणून ब्रिटिश शासनकर्त्यांमध्ये होणारी त्यांची ऊठबस आणि ओरिसातील सर्व शाळांमधील अभ्यासक्रमात समाविष्ट झालेली त्यांची विविध विषयांची पाठ्यपुस्तके यामुळे वयाच्या ऐन विशीमध्येच फकीरमोहनांचे नाव राष्ट्रीय पातळीवर चर्चिले जाऊ लागले होते.

पैशांची काळजी करावी अशी परिस्थिती आता राहिली नव्हती. त्यामुळे फकीरमोहन आता आपला जास्तीत जास्त वेळ आपल्या लोकांची स्थिती कशी सुधारता येऊ शकेल, या गोष्टीकडे देऊ लागले होते.

त्या वेळी ओरिया लोकांना आर्थिक आणि प्रशासकीय गैरव्यवस्थेच्या जोडीला आणखी एक क्रूर प्रकारची चेष्टा सहन करावी लागत होती. सगळी पाठ्यपुस्तके बंगाली भाषेमध्ये लिहिलेली होती. ओरिया भाषेतले एकही पाठ्यपुस्तक उपलब्ध नव्हते. हा राष्ट्रीय अपमान फकीरमोहनांच्या मनाला फार लागला होता; अन् त्यांनी ओरिया भाषेत सगळी पाठ्यपुस्तके लिहिण्याचा संकल्प सोडला. देवाच्या दयेने या नवशिक्या देशभक्ताला अपेक्षेपेक्षा जास्त यश लाभले. पहिल्याच प्रयत्नाला मिळालेले हे यश पाहून फकीरमोहनांचे मन उल्हसित झाले अन् त्यांनी आपला मोहरा ओरिया भाषा आणि ओरिया साहित्य यांच्याकडे वळवला.

एका साध्या मजुरातून एका राष्ट्रीय पातळीच्या नेत्याची अगदी अविश्वसनीय वाटावी अशी उत्क्रांती कशी झाली हे त्यांच्या स्वत:च्या शब्दांमध्ये जाणून घेणे अधिक योग्य ठरेल.

"जेव्हा केव्हा एखादे बंगाली पुस्तक मी हाताळीत असे, तेव्हा तेव्हा माझे मन आत्यंतिक निराशेने ग्रासून जात असे. त्या पुस्तकाची पाने चाळताना एकच प्रश्न मी स्वत:ला वारंवार विचारीत असे, "माझ्या भाषेत असे पुस्तक केव्हा येणार?" ओरिया भाषेची दशा माझ्या काळजात वेदनेची एक चमक उठवून जाई. ज्या थोड्या उडिया लोकांना इंग्लिश किंवा पर्शियन येत असे ते लोकदेखील ओरिया भाषेत बोलणे कमीपणाचे समजत असत. किंवा आपण आपल्या ऑफिशियल करियरमध्ये त्यामुळे मागे पडू अशी भीती त्यांना वाटत असे. असे लोक आपला अमूल्य वेळ किंवा पैसा ओरिया भाषेत पुस्तके यावीत यासाठी खर्च करतील, अशी अपेक्षा तरी कशी करावी? त्यामुळेच मी रात्रंदिवस माझे लक्ष माझी मातृभाषा सुधारण्याच्या प्रयत्नांकडे लावण्याचे ठरवले. प्रत्यक्षात जरी मी वेगवेगळी कामे करीत असलो तरी माझ्या अंतर्मनात मात्र सदैव हाच एकमेव विचार घोळत असे. बंगालीसारखी ओरिया भाषेतही पुस्तके काढावीत, हा एक ध्यासच माझ्या मनाला लागला होता.

"पण त्या वेळी ओरिया भाषेत लिहिणारे लेखक तरी कुठे होते? मी स्वत: लेखक होऊ शकेन का, याबद्दल माझी मलाच शंका वाटत होती. ओरिया भाषेत स्वत:चे असे एकही साप्ताहिक किंवा जर्नल नव्हते. मी माझे छोटे छोटे लेख बंगालीमधील 'सोमप्रकाश'कडे छापायला पाठवत असे. हे लेख जसजसे छापून यायला लागले तसतसा 'मीही लेखक होऊ शकेन' असा विश्वास माझ्या मनात जागा होऊ लागला. पूर्वी गावाकडे असताना मी कृष्णलीलेवरची काही गाणी रचली होती. पुढे जाहीर कार्यक्रमांमधून ती गाणी गायली जाऊ लागली. हे पाहून माझा आत्मविश्वास दुणावला.

"आता मी काहीतरी मोठे अन् तेही गद्यरूपात लिहायचे ठरवले. त्यानुसार 'History of Prince' लिहिले. माझ्या मित्रांना ते आवडले. सबंध ओरिसात त्या वेळी मिशन प्रेस नावाचे एकच मुद्रणालय कटक येथे होते. मी माझे हस्तलिखित त्यांच्याकडे पाठवले. पण ते छापण्यासाठी मला तीनशे रुपये खर्च येईल असे जेव्हा त्यांनी मला कळवले तेव्हा मी अवाक् होऊन गेलो. माझ्या मनातील निराशेच्या अंधारात 'History of Prince' खोलवर बुडून गेले. परिणामी पुस्तक छापण्याची कल्पना हवेतच विरून गेली."

## उडिया लोक आणि छापील साहित्य

त्या काळी सर्वसामान्य उडिया लोकांना ओरिया भाषेतील गद्यसाहित्याची साधी तोंडओळखदेखील नहती. वेगवेगळ्या वृत्तांमध्ये आणि छंदांमध्ये गुंफलेल्या काव्याचे गायन करणे किंवा ते ऐकणे म्हणजेच साहित्य अशी त्यांची धारणा होती. पण असे एखादे लोकप्रिय काव्यही त्या काळी छापील स्वरूपात उपलब्ध नव्हते. उडिया लोकांना ओरिया भाषेतील छापील अक्षरांची ओळख करून द्यायची तर ती असे एखादे लोकप्रिय काव्य छापून करून द्यावी, असे आम्ही ठरवले. लोकांना ते अगदी सहज आणि स्वस्त किमतीमध्ये उपलब्ध करून देणेही आवश्यक होते. तसे करायचे तर ओरियाचे स्वत:चे मुद्रणालय असणे आवश्यक होते. कटक येथील मिशन प्रेसवर आम्हाला इत:पर अवलंबून राहता येणार नव्हते.



## सेनापतींचे मुद्रणालय

त्यानंतर तरुण सेनापती सरांनी आपले सगळे लक्ष ओरिसामधील दुसरे मुद्रणालय बालासोर येथे सुरू करण्याकडे केंद्रित केले. त्यांच्या स्वत:जवळ तर पैसे नव्हतेच; म्हणून त्यांनी एक जॉईंट स्टॉक कंपनी सुरू केली. या विषयात बिलकूल आस्था नसलेल्या लोकांकडून आणि अगदी कातडीबचावू वृत्तीच्या लोकांकडूनही त्यांनी मोठ्या हिकमतीने वर्गणी गोळा केली. ही सगळी जमवाजमव त्यांनी कशी केली ती एक मोठी चित्तरकथाच आहे. "बालासोर येथे सहकारी तत्त्वावर मुद्रणालय सुरू करणे एवढे एकच काम जरी फकीरमोहन यांनी केले असते तरी आधुनिक ओरिसाच्या इतिहासात त्यांचे नाव अमर झाले असते," असे उद्गार प्रसिद्ध कवी राधानाथ यांनी फकीरमोहनांबद्दल अगदी सार्वजनिकरीत्या काढले होते अन् त्याबद्दल कुणाचेही दुमत नव्हते.

बैलगाडीतून मुद्रणालयाचे सामान कलकत्त्याहून बालासोरला आणण्यात आले. जुळवाजुळव करून मुद्रणालय चालू व्हायला बरोब्बर बावीस दिवस लागले. सेनापतींच्या प्रेसमध्ये दिवसाउजेडी छपाई होणार ही घटना बालासोरच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखी होती. आपल्या स्वत:च्या डोळ्यांनी हा चमत्कार पाहण्यासाठी तेथील कारकून लोकांनी सामूहिक रजा घेतली होती. पुढे कितीतरी दिवस दूरदूरच्या गावांवरून धनाढ्य लोक अगदी पालख्यांमध्ये बसून बालासोरला येत होते, केवळ प्रिंटिंग मशीन कसे असते हे पाहण्यासाठी! मुद्रणालय सुरू झाल्यानंतरच्या सहा महिन्यांच्या काळात ओरिसा डिव्हिजनचे कमिशनर टी. ई. राव्हेन्शा आणि जॉन बीम्स यांच्यासारख्या मातब्बर व्यक्तींनीही सेनापतींच्या मुद्रणालयाला आवर्जून भेट दिली होती. त्याच काळात विल्यम्स कॅक्सन यांनी वेस्टमिनिस्टर येथे असाच एक धाडसी प्रकल्प सुरू केला होता. खुद्द ब्रिटिश राजा आणि राणी यांनी या प्रकल्पाला भेट देऊन त्यांना त्याबद्दल दाद दिली होती. कमिशनर राव्हेन्शा यांनी सेनापतींकडून त्यांचा मुद्रणालयाचा अनुभव लक्षपूर्वक ऐकला आणि खूष होऊन त्यांना दहा रुपये बक्षिसादाखल

दिले. फकीरमोहनांनी त्या दहा रुपयांचे राव्हेन्शांच्या नावानी 'शेअर' करून दिले. पुढे जेव्हा कंपनीने आपला कारभार गुंडाळला तेव्हा सेनापतींनी शेअर आणि डिव्हिडंड मिळून तीस रुपयांची रक्कम राव्हेन्शा यांना परत केली.

## जर्नल्सचे संपादक

बेंजामिन फ्रँकलिनची आठवण करून देणारा उत्साह त्या काळी तरुण फकीरमोहनांच्या अंगी सळसळत होता. एक मुद्रणालय उत्तम प्रकारे चालवून दाखवले, एक उत्तम शिक्षक, कुशल हेडमास्तर म्हणून आणि लेखक म्हणून नावलौकिक मिळवला; पण एवढ्या यशाने तृप्त होणाऱ्यांपैकी फकीरमोहन नव्हते. त्यांनी आता संपादनाच्या क्षेत्रात पाऊल टाकण्याचे ठरवले. 'बोधदायीनी' आणि 'बालासोर संवाद वाहिका' अशी दोन नियतकालिके त्यांनी सुरू केली. त्यापैकी पहिले केवळ साहित्याला वाहिलेले होते, तर दुसऱ्यात फक्त बातम्या आणि प्रतिक्रिया छापल्या जात असत. या नियतकालिकांचे लेखक, मुद्रक, प्रकाशक, वितरक आणि वित्त–सहाय्यक असे सबकुछ फकीरमोहनच होते.

***

# 5

# स्वभाषेचा तारणहार

बालासोर येथे नव्यानेच सुरू झालेल्या गव्हर्नमेंट हायस्कूलमध्ये याच काळात थेट बंगालमधून एका बंगाली पंडिताची नेमणूक झाली होती. त्याने एक पुस्तक लिहून प्रकाशितही केले होते. त्यात त्याने ओरिया ही स्वतंत्र भाषा नसून ती बंगालीची केवळ एक बोलीभाषा आहे, सबब सबंध ओरिसामधून ती काढून टाकण्यात यावी आणि तिच्या जागी बंगाली भाषेची प्रतिष्ठापना व्हावी असे प्रतिपादन केले होते. आपल्या भाषेवर आणि लोकांवर कोसळलेल्या या संकटाचे वर्णन करताना फकीरमोहनांचे शब्दही दु:खाने जड झालेले दिसतात. ते लिहितात –

''बालासोर जिल्हा स्कूलच्या बंगाली हेडमास्तरांनी बालासोरच्या बंगाली डेप्यूटी इन्स्पेक्टर ऑफ स्कूल यांच्याद्वारे हे पुस्तक इन्स्पेक्टर्स ऑफ स्कूल्सकडे पाठवले. जोडीला त्यांनी या पंडित क्रांतीचंद्र भट्टाचार्यांच्या प्रतिपादनाची जोरदार शिफारसही केली. त्या वेळी संपूर्ण ओरिसा एकाच शिक्षण मंडळाचा विभाग गणला जात होता. मंडळाचे मुख्य ऑफिस मिदनापूर येथे होते. त्या वेळी आर. एल. मार्टिन नावाचे एक इंग्रजी गृहस्थ इन्स्पेक्टर ऑफ स्कूल म्हणून काम पाहत होते. हे इन्स्पेक्टर जरी इंग्रजी असले तरी त्यांच्या हाताखाली काम करणारे सगळे ऑफिसर्स लोक बंगाली होते. त्यामुळे मिदनापूर येथे इन्स्पेक्टर ऑफ स्कूलकडून लगेच ऑर्डर आली की, 'इत:पर बालासोर येथील गव्हर्नमेंट स्कूलमध्ये ओरिया भाषा न शिकवली जाता फक्त संस्कृत आणि बंगाली भाषाच शिकवल्या जाव्यात.'

## सेनापतींची प्रतिहल्ल्याची तयारी

''बालासोरमधल्या आमच्यासारख्या सुशिक्षित उडिया लोकांवर तर हा वज्राघातच होता. त्याने आम्हाला दिङ्मूढ करून टाकले. मोठ्या कासाविशीने आम्ही एकमेकाला विचारू लागलो, 'हे काय होतेय तरी काय? आता काय करायचे? आमच्या मातृभूमीमध्येही आम्हाला आमची भाषा शिकण्याचा अधिकार नसावा?' मी माझ्या जुन्या मित्रमंडळींमध्ये हा विषय काढून त्यांना जागे करण्याचा प्रयत्न केला. आमची मातृभाषा वाचविण्याचा एखादा तरी मार्ग, एखादा तरी उपाय सुचावा यासाठी आम्ही

आमची डोकी रात्रंदिवस पिंजून काढली. पण काही उपाय हाती लागेना. आम्ही मग सगळ्या दुय्यम उडिया ऑफिसर्सना एकत्र गोळा केले. त्यांना आपण सर्व मिळून या ऑर्डरचा प्रतिकार करू असे आवाहन केले. पण त्यांनी एकमुखाने उत्तर दिले – "हे पहा, हा सर्वस्वी सरकारी मामला आहे. सरकार जे म्हणेल, जसे म्हणेल ते अन् तसेच आमची मुले शिकतील. सरकारी निर्णयाच्या विरोधात जाऊन स्वत:वर विनाकारण संकट ओढवून घेण्याची काय गरज आहे आपल्याला?"

"या ऑफिसर्सनी असे म्हटलेले पाहून ओरिसातल्या काही थोड्या जमीनदारांनी अन् श्रीमंत असामींनीही त्यांचीच री ओढली. त्यांनी तर आमचे म्हणणे ऐकून घ्यायलाही नकार दिला. "हे सगळे इतके पॉवरफूल अधिकारी असूनदेखील सरकारी हुकुमाविरुद्ध वागण्याचे धाडस ते करू शकत नाहीत तर मग आम्ही या हुकुमाविरुद्ध वागून सरकारची इतराजी ओढवून घ्यावी असे तुम्हाला वाटते का?" असे त्यांचे म्हणणे होते.

पण आपले तरुण हेडमास्तर अशा निराश करणाऱ्या अनुभवांनी खचून जाणाऱ्यांमधले नव्हते. हा नाही तर तो असे वेगवेगळे मार्ग ते शोधू लागले. त्यांनी ओरिसातील सगळ्या उडिया ऑफिसर्सना पुहा एकदा एकत्र गोळा केले अन् त्यांच्यासमोर अतिशय हुशारीने हा प्रश्न पुन्हा मांडला. दारिद्र्य, गरिबी हा ओरिसातला कळीचा प्रश्न होता हे लक्षात घेऊन फकीरमोहनांनी आपल्या भाषणात लोकांच्या या दुखऱ्या नसेवर अचूकपणे बोट ठेवले. ते म्हणाले –

"प्रिय बंधूनो – एक गोष्ट लक्षात घ्या. ओरिया भाषेच्या जागी बंगाली भाषा शिकवणे हा सरकारचा निर्णय मुळीच नाही आहे. हा सर्व बंगाली लोकांचा कट आहे. ब्रिटिश इन्स्पेक्टर ऑफ स्कूलच्या डोळ्यात धूळ झोकून त्यांनी हे घडवून आणले आहे. पण एक गोष्ट नीट लक्षात घ्या. शाळांमधून ओरिया काढून टाकण्यात त्यांना आता यश मिळाले की ते पुढच्या वेळी कोर्टातून आणि ऑफिसेसमधूनही ओरिया काढून टाकण्याचा प्रयत्न नक्की करतील. तुम्हाला आठवते ना, पूर्वी पर्शियन ही ऑफिसात कामकाजाची भाषा होती; पण तिचे उच्चाटन केले गेले ते इंग्लिश येणाऱ्या बंगालीबाबूंसाठी! ओरिसामधील सगळ्या चांगल्या सरकारी नोकऱ्या बळकावण्याचा त्यांचा हा डाव आहे. तुम्ही लहानपणापासून मोठ्या परिश्रमाने मिळविलेले पर्शियन भाषेचे ज्ञान आज जसे कवडीमोलाचे ठरले, तसेच आज ओरिया भाषा काढून तिची जागा एकदा का बंगालीने घेतली की ओरिसामधल्या सगळ्या नोकऱ्या आपसूकच पिढी–दरपिढी बंगाल्यांच्या घशात जाणार आहेत. एक दिवस असा येईल की, तुम्हा सगळ्यांना एकसाथ घरी बसवले जाईल अन् तुमच्या जागी कलकत्याहून आलेले नवीन बंगाली तरुण नोकऱ्यांवर नेमले जातील. मला अंधाराशिवाय दुसरे काहीच दिसत नाही."



"माझ्या या शब्दांनी–" फकीरमोहन लिहितात – "सभेमध्ये एकच खळबळ उडाली. ते एकसाथ ओरडू लागले की, नाही! नाही! असे होऊन चालणार नाही. आमच्या मुलांना शाळेमध्ये ओरिया शिकवले गेलेच पाहिजे. त्यासाठी काय करायचे ते सांगा. आम्ही सगळे तुम्ही जे सांगाल ते करायला तयार आहोत."

"आपण सरकारकडे एक निवेदन पाठवू," मी त्यांना म्हणालो. "हा सगळ्यात सोपा आणि उत्तम मार्ग आहे. सरकार नक्कीच याचा विचार करेल अन् ओरिया भाषा पुन्हा सुरू करेल. एकदा हे झाले की मग पुढच्या काळात बंगाली लोकांनी सगळ्या नोकऱ्या बळकाविण्याचा प्रश्नही उरणार नाही." "मग लगेच निवेदन तयार करा," त्यांनी एकसाथ गलका केला.

आम्ही अतिशय काळजीपूर्वक एक निवेदन तयार केले. त्या निवेदनावर सह्या गोळा केल्या; आणि ते डिस्ट्रिक्ट कलेक्टरला सादर केले. उडिया लोकांचे भाग्यही त्या वेळी जोरावर होते म्हणायचे, कारण त्या वेळचे सगळे ब्रिटिश ऑफिसर्स आणि इंग्लिश ख्रिश्चन मिशनरीज आमच्या बाजूला होते. त्यांनी आमची ही मागणी उचलून धरली. बालासोर येथील डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट असलेल्या जॉन बीम्स यांच्याकडे प्रथम हे सामूहिक निवेदन गेले. ते स्वत: भाषाशास्त्राचे गाढे विद्वान होते. त्यांनी जोरदार शिफारशीसह ते निवेदन ओरिसा डिव्हिजनचे कमिशनर टी. ई. राव्हेन्शा यांच्याकडे पाठवले. बीम्स एवढेच करून थांबले नाहीत, तर त्यांनी ओरिया ही स्वतंत्र आणि प्राचीन भाषा असून तिच्या योग्य त्या विकासासाठी सरकारने उचित पावले उचलली पाहिजेत असे सांगणारे एक पत्रकही काढले. या पत्रकाची एक प्रत त्यांनी बंगाल सरकारकडेही पाठवली. त्यामुळे त्यांच्या शिफारसीला अधिक बळकटी आली.

टी. ई. राव्हेन्शा यांच्या मनात ओरिसा आणि उडिया लोकांबद्दल ममत्वाची भावना होतीच. त्यामुळे त्यांनीही सरकारकडे ओरिया भाषा कायम ठेवण्याची शिफारस केली. तिचा परिणाम म्हणून सरकारकडून 'सबंध ओरिसा राज्यातील शाळांमधून बंगाली काढून टाकण्यात यावे अन् ओरिया भाषेचे शिक्षण देण्यासाठी अन् त्या भाषेच्या विकासासाठी नवीन ओरिया शाळा सुरू करण्यात याव्यात,' असा नवा आदेश आला.

त्यांच्या या कार्यासाठी उडिया लोक डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट बीम्स आणि कमिशनर राव्हेन्शा यांचे सदैव ऋणी राहतील.

***

# 6

# हिकमती प्रशासक

बालासोर येथे जवळजवळ दहा वर्षे यशस्वीपणे शिक्षकाची नोकरी केल्यानंतर फकीरमोहन यांनी अध्यापन हाच आपला आयुष्यभराचा व्यवसाय ठरवून टाकला. आतापर्यंत ते खासगी संस्थांमध्ये काम करीत होते. सरकारी संस्थांमध्ये किंवा शाळांमध्ये काम करणाऱ्या लोकांना खासगी संस्थांमधील लोकांपेक्षा अधिक पगार मिळत असे. त्यामुळे त्यांना अधिक सुरक्षित वाटत असे. शिवाय बढतीच्या संधीही त्यांना अधिक असत. अशीच एक संधी अगदी अनपेक्षितपणे फकीरमोहनांच्या दारी चालून आली. ओरिसातील बुद्धिवंतांचे आणि प्रशासनाचे केंद्र समजल्या जाणाऱ्या कटक शहरातील नॉर्मल टीचर्स ट्रेनिंग स्कूलमध्ये दुय्यम पंडिताची जागा रिकामी झाली. तत्कालीन इन्स्पेक्टर ऑफ स्कूल असलेल्या आर. एल. मार्टिन यांनी त्या जागेसाठी बालासोर येथील मिशन स्कूलच्या हेडमास्तरांची म्हणजेच फकीरमोहनांची नेमणूक करून टाकली. या जागेसाठी त्यांना मिळणारा पगार आधीच्या पगाराच्या जवळपास तिपटीने जास्त होता. शिवाय इतर फायदे मिळणार होते ते वेगळेच. त्यामुळे त्यांनी ही नोकरी स्वीकारण्याचे ठरवले. पण त्याबद्दल ते जेव्हा रेव्ह. सी. बी. हेल्म यांच्याशी बोलले तेव्हा त्यांनी सेनापतींचा पगार कटक येथे त्यांना मिळणाऱ्या पगाराइतका वाढवून टाकला आणि सेनापतींनीच नावारूपाला आणलेली शाळा त्यांनी सोडून जाऊ नये अशी इच्छाही व्यक्त केली. अर्थातच फकीरमोहनांनी कटकला जाणे रद्द केले अन् ते त्याच शाळेत राहिले.

## बीम्स यांचा प्रस्ताव

अशा प्रकारे सरकारी नोकरीत होणारा फकीरमोहन यांचा प्रवेश त्यांचा कुठलाही दोष नसताना होता होता राहून गेला. पण त्याच वेळी नियतीने एका अधिक आकर्षक संधीचे दार त्यांच्यासाठी उघडले होते. आधीच्या त्यांच्या रटाळ आयुष्यात त्यांना कधीच मिळू शकली नसती अशी सुवर्णसंधी त्यांच्याकडे चालून आली.

आता आतापर्यंत म्हणजे जेमतेम पंचवीस वर्षांपूर्वीपर्यंत ओरिसा हे राजेमहाराजांच्या आणि जमीनदारांच्या अधिपत्याखाली असलेले राज्य होते. निलगिरी हे असेच एक



छोटे संस्थान बालासोरजवळ होत. भारत स्वतंत्र झाल्यानंतर हे संस्थान खालसा करून बालासोरमध्ये विलीन करण्यात आले. तर या निलगिरी संस्थानाला एका दिवाणाची गरज निर्माण झाली. जॉन बीम्स यांनी फकीरमोहनांनी ही जागा स्वीकारावी अशी इच्छा प्रदर्शित केली. आपल्या या तरुण मुख्याध्यापकाने आपल्या कामाने अन् प्रिंटिंग प्रेस कंपनी चालू करण्याच्या धाडसाने स्थानिक ब्रिटिश ऑफिसरांच्या हृदयात किती मोठी जागा मिळविली होती त्याचेच हे द्योतक होते. फकीरमोहनांनी कुठलेही आढेवेढे न घेता बीम्स यांच्या इच्छेला मान दिला अन् हे दिवाणपद स्वीकारले. इतकी चांगली जागा कोण नाकारणार होते? आजदेखील कुणी हरीचा लाल अशा जागेचा मोह टाळू शकणार नाही.

1871 साली फकीरमोहन निलगिरी संस्थानात दिवाण म्हणून रुजू झाले. त्या वेळी ते फक्त 28 वर्षांचे होते. पुढच्या काळात त्यांनी दोमपाडा, धेन्कानल, दासपल्ला, पाल–लहारा, केन्दुझार आणि केंद्रापाडा अशा ओरिसामधल्या वेगवेगळ्या संस्थानांमध्ये दिवाण, उपदिवाण, मॅनेजर अथवा असिस्टंट मॅनेजर म्हणून काम केले. 1892 मध्ये निवृत्त होईपर्यंत त्यांच्या गाठीला जवळजवळ पंचवीस वर्षांचा प्रशासकीय क्षेत्राचा अनुभव जमा होता. या विविध पदांमुळे वेगवेगळे स्त्रीपुरुष स्वभावाचे नमुने, त्यांचे आपापसातील संबंध–संघर्ष यांच्या विस्तृत पटाचे एका विशिष्ट अंतरावरून आणि वेगळ्या दृष्टिकोनातून त्यांना दर्शन झाले होते. त्यांच्या शाळामास्तराच्या जीवनात हा विस्तृत अनुभव त्यांना कधीच मिळू शकला नसता. या त्यांच्या निरीक्षणातूनच पुढे त्यांच्या कथाकादंबऱ्यांतील चैतन्याने सळसळणारी पात्रे निर्माण झालेली दिसतात. इतक्या शक्यता पोटी दडवलेली दिवाणपदाची ही संधी सेनापतींच्या वाट्याला आली नसती तर सेनापती ओरिसातील एका दुय्यम शाळेतील उत्साही शिक्षक होऊन राहिले असते. या माणसाच्या लेखणीतून ओरिया साहित्यात एकाही कलाकृतीची भर पडली नसती.

## एक आधुनिकतावादी

ज्या ज्या ठिकाणी फकीरमोहन दिवाण किंवा मॅनेजर म्हणून गेले, त्या त्या ठिकाणी त्यांनी काहींना काही सुधारणा, नवीन बदल जरूर घडवून आणले. वाचकांना वाचून आश्चर्य वाटेल, पण जवळजवळ शंभर वर्षांपूर्वी जेव्हा फकीरमोहन निलगिरी संस्थानचे दिवाण होते, तेव्हा त्यांनी व्यावसायिक स्तरावर चहाचे मळे लावायला सुरुवात केली होती. त्या भागात पहिली बाजारपेठ, पहिली संस्कृत शाळा, इंग्लिश पद्धतीचे स्कूल आणि बाहेरच्या गावांना निलगिरीशी जोडणारे पहिले रस्ते त्यांच्याच दिवाणपदाच्या काळात बांधले गेले. तेथे मोठ्या प्रमाणात नारळीची लागवडही त्यांनीच सुरू केली होती. जेथे जातील तेथे ते स्वत:चा असा एक उत्तम बगीचा तयार

करत असत. या बगीच्यात स्थानिक लोकांना माहीत नसलेल्या अनेक नवीन प्रकारच्या भाज्या आणि पाश्चात्त्य फुलझाडांची लागवड केली जात असे. विविध ठिकाणांहून मुद्दाम मागवून लागवड केलेल्या दुर्मिळ आणि वेचक जातींच्या गुलाबांच्या फुलांचा एक वाफा फकीरमोहनांच्या विशेष आवडीचा असे. त्यांनी त्या काळी जपानहून एक 'हुस्न-हीना' नावाचा गुलाब मागवला होता. हा गुलाब फक्त रात्रीच्या वेळी फुलत असे. त्या नाजूक फुलाच्या सौंदर्यावर आणि सुगंधावर फकीरमोहन इतके फिदा झाले होते की, समुद्रापलीकडून आणलेल्या त्या गुलाबाच्या सौंदर्याचे स्तोत्र गाणारे एक काव्यही यांनी लिहिले होते. त्यांनीच कॅबेज, कॉलिफ्लॉवर यासारख्या परदेशी भाज्यांचा परिचय ओरिसातील ग्रामस्थांना करून दिला. त्या वेळची हकिकत फकीरमोहनांनी लिहून ठेवली आहे. दासपाडा येथे असताना त्यांनी काही ग्रामप्रधानांना आपल्याकडे बोलावले आणि आपल्या बागेत उगवलेले कॅबेजचे गड्डे त्यांना दिले. पुढे काही दिवसांनी हे प्रधान त्यांना भेटले तेव्हा साहजिकच फकीरमोहन यांनी त्यांना कॅबेजची भेट कशी वाटली असे विचारले. त्यावर सर्वांनी एकमुखाने एकच तक्रार केली की, 'हुजूर, आमच्या बायकांनी ते गड्डे चांगल्या कढत, खाऱ्या कांजीमध्ये खूप वेळ उकळवले, पण त्यांचा तो उग्र, उबट वास काही गेला नाही.'

फकीरमोहनांच्या आत्मवृत्ताचा मोठाच भाग ते दिवाण असताना किंवा मॅनेजर असताना त्यांना अनुभवाला आलेल्या अशा छोट्या छोट्या मजेदार प्रसंगांनी व्यापला आहे. अगदी साध्या, अनलंकृत भाषेत त्यांनी हे प्रसंग मोठे चटकदारपणे रंगवले आहेत. फकीरमोहनांच्या विरोधकांना कदाचित हे प्रसंग त्यांची स्वत:ची फुशारकी सांगणारे वाटतील पण स्वत: ब्रिटिश ऑफिसरांनीदेखील त्यांच्या कुशल प्रशासनाचा, त्यांच्या कर्तृत्वाचा जो दाखला वेळोवेळी दिला आहे तो तर काही नक्कीच पूर्वग्रहदूषित नसणार!

ओरिसा डिव्हिजनचे कमिशनर टी. ई. राव्हेन्शा म्हणजे कुणी येरीगबाळी असामी नव्हती. 1873 मध्ये बंगाल गव्हर्नमेंटच्या सेक्रेटरीला पाठविलेल्या वार्षिक अहवालात त्यांनी म्हटलेय – "मी आजपर्यंत पाहिलेल्या उडिया लोकांपैकी फकीरमोहन ही सर्वोत्तम व्यक्ती होती. बाबू फकीरमोहनांनी बालासोर येथील मिशन स्कूलचा कारभार उत्तमरीतीने सांभाळला होता. निलगिरी संस्थानातील दिवाणपदाची अधिक चांगली जागा मिळाल्यामुळे त्यांनी ती नोकरी पुढे सोडून दिली. पण त्या पदावरूनही ते आपले नवीन सुधारणा राबविण्याचे आणि सचोटी व न्याय या मूल्यांचा पुरस्कार करण्याचे कार्य अविरतपणे करत आहेत. या माणसाने प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे जी अनेक चांगली कामे केली आहेत त्यापैकी ही काही आहेत. त्यांची उणीव आम्हाला सर्वांना खोलवर भासते आहे!"



## मॅकियावेलीचा अज्ञात शिष्य

आज मागे वळून पाहताना जाणवते की, मॅकियावेलीने आपल्या 'प्रिन्स'मध्ये शासकांना जो उपदेश केला आहे त्याची सुतराम जाणीव नसतानादेखील फकीरमोहनांनी या इटालियन राजकारणी आणि लेखकाचे शहाणपणाचे धडे सहज गिरवले आहेत. एक धुरंधर प्रशासक म्हणून कार्य करताना जुलुमाखाली भरडल्या जाणाऱ्या कुळांचा सहृदय उपकारकर्ता म्हणून तसेच प्रशासकीय गुंतागुंती सोडवताना बिनदिक्कत चलाखी दाखविताना त्यांनी आपल्यातले हे गुणधर्म कधीही लपवले नाहीत.

गांधीजींनी असहकारितेच्या चळवळीची संकल्पना जगाच्या कानाकोपऱ्यात पोहोचवली. पण त्याच्या कितीतरी काळ आधी सबंध ओरिसामध्ये वेळप्रसंगी सामाजिक किंवा राजकीय बाबींमध्ये हे असहकारितेचे धोरण पाळले जात होते. आजही ओरिसाच्या सुदूर ग्रामीण भागांमधील रांगड्या लोकांमध्ये हे असहकारितेचे धोरण आवश्यक असेल तेव्हा पाळले जाते.

## दोमपाड्याच्या समस्या

दोमपाडा ही कटक जिल्ह्यातील एक लहानशी इस्टेट होती. आज ती कटकमध्ये विलीन केली गेली आहे. फकीरमोहन तिथे जेव्हा दिवाण म्हणून रुजू झाले, तेव्हा तिथे नुकताच नवीन राजा गादीवर आला होता. त्याचे शिक्षण कलकत्त्याला झाले होते. साहजिकच जंगलांनी वेढलेल्या या राजधानीतील संथ, कंटाळवाण्या वातावरणापेक्षा शहरातील मौजमजेच्या आयुष्याकडे त्याचा ओढा अधिक होता. त्यामुळे आपला जास्तीत जास्त वेळ तो कलकत्ता किंवा अशाच कोणत्यातरी मोठ्या शहरात घालवत असे. आपला पिढीजात राजवाडा, आपली प्रजा इतकेच काय पण आपल्या राणीकडे देखील तो मुळीच लक्ष देत नसे. आपल्या मौजमजेसाठी त्याला भरमसाट पैसा लागत असे. तो कसा मिळवता येईल, याचाच विचार सतत त्याच्या मनात असे. हा पैसा मिळविण्याचा एक मार्ग म्हणून त्याने आपल्या इस्टेटीमधील जुन्या जमीनभाड्यात बरीच वाढ केली. त्यासाठी त्याने भाडेपट्ट्यांचे नूतनीकरण करण्याचे ठरवले.

पण कर द्यायला कोण तयार असतो? नवीन करार करण्याच्या प्रस्तावाला दोमपाड्यातील अशिक्षित लोकांनीही कडाडून विरोध केला. काही लोक जमिनीवर अनधिकृत कब्जा करून बसले होते. ते तर एक पैदेखील कर म्हणून भरत नव्हते. आता नवीन करार करायचा म्हणजे या अनधिकृत जमिनींवर कर भरावा लागणार हे त्यांनी ओळखले. अशा प्रकारे कर चुकविणाऱ्यांमध्ये गावातील काही ब्राह्मण मंडळी आणि गावप्रमुख किंवा प्रधानही होते. आपला डाव साधण्यासाठी या लोकांनी गावातील साध्याभोळ्या निरक्षर जमीनधारकांना या कराराविरुद्ध बंड करण्यास उचकावले. इतके करूनही राजा बधला नाही तेव्हा त्यांनी भाडे आणि कर देणे तर थांबवलेच पण राजाच्या कुटुंबावर आणि भाडेपट्टी गोळा करणाऱ्यांवर सामाजिक बहिष्कार सुरू केला.

वयाच्या तेहतिसाव्या वर्षी फकीरमोहन दोमपाडा येथे दिवाण म्हणून रुजू झाले. त्या वेळी राजवाड्याची दुर्दशा पाहण्यासारखी होती. राजवाडा ठिकठिकाणी पडला होता, भोवताली जंगली झाडाझुडपांचे साम्राज्य पसरले होते. राजा बहुधा गावात नसेच. स्वत:ची गुजराण तो कर्जाऊ रकमा काढून करत असे. त्याच्या राणीवशातील स्त्रियांनी कटकच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे थोड्याशा ॲलिमनीसाठी अर्ज केला होता. श्री. जॉन बीम्स त्या वेळी कटक जिल्ह्याचे मॅजिस्ट्रेट म्हणून काम पाहत होते. त्यांच्याकडे दोन्ही पक्षांकडून वारंवार येणाऱ्या उलटसुलट अर्जांना तेही कंटाळून गेले होते. जमीनमालक राजा आणि त्याच्या विरोधात बंड करून उठलेली प्रजा यांच्यामध्ये समेट घडवून आणण्याच्या कामासाठी त्यांनी जाणूनबुजून फकीरमोहनांची निवड केली होती. फकीरमोहन आपल्या अक्कलहुशारीने हा समेट घडवून आणतील असा त्यांना पूर्ण विश्वास होता.

## असहकारिता – एक जुनी उडिया पद्धती

फकीरमोहन अशी काही तडजोड घडवून आणण्याच्या प्रयत्नाला लागलेही, पण झाले भलतेच! दबलेल्या ठिणग्यांनी पुन्हा ज्वाळांचे रूप धारण करावे तसे बंड पुन्हा उफाळून आले. तिथला माजी दिवाण अन् एक स्थानिक धनाढ्य जमीनदार यांच्या नेतृत्वाखाली विरोधकांनी एक समांतर अशी प्रशासन व्यवस्था सुरू केली. एक फर्मान काढून त्यांनी प्रत्येक गावातील सर्व जातीच्या लोकांना राजवाड्याशी असलेले त्यांचे सर्वप्रकारचे सामाजिक आणि व्यावसायिक संबंध तोडण्यास बजावले. राजवाड्यातील नोकराचाकरांना देखील हे फर्मान लागू होते. त्यानुसार रोजच्या धोब्याने राजवाड्यातील कपडे धुण्याचे नाकारले. आता कपडे कटकसारख्या दूरच्या गावातून धुवून आणावे लागू लागले. कोळी, गवळी, पाणके यांनीसुद्धा राजवाड्याशी असलेला आपला पिढ्यान्‌पिढ्याचा संपर्क बंद केला.

दोन्ही बाजूंना सुखकारक असा तोडगा काढण्याचे फकीरमोहनांच्या मनात होते पण दोन्हीही बाजूंच्या लोकांच्या मनात त्यांच्याबद्दल विश्वास नव्हता. राजा त्यांना मॅजिस्ट्रेटचा माणूस समजत होता तर दिवाण असल्याने जमीनधारक त्यांना राजाचा माणूस समजत होते. कुठल्याही शासकीय अधिकाऱ्याच्या वाटेला येऊ नये अशा बिकट अवस्थेत फकीरमोहन सापडले होते.

1876 च्या डिसेंबरमध्ये प्रत्यक्ष तपासणीसाठी श्री. बीम्स दोमपाड्याला आले. फकीरमोहनांनी केलेली विनंती मान्य करून कुठलीही नवीन करवाढ न करता नवीन करारपत्र तयार करण्याला त्यांनी संमती दिली होती. राजा तर दोन्ही गोष्टींसाठी हटून बसला होता. सरकारी वर्तुळात राजाची कीर्ती आधीच एक चक्रम गृहस्थ म्हणून पसरलेली होती. त्यातून आपल्या भाडेकरू जमीनधारकांशी संघर्ष करण्यात त्याला यश मिळवता आले नव्हते. त्यामुळे तर त्याच्यावर सर्व इस्टेट गमावण्याची पाळी आली होती. पण दोमपाड्यासारखे ओरिसातील एखादे पुरातन संस्थान असे रसातळाला जावे अन् तेही आपल्या दिवाणगिरीच्या काळात हे फकीरमोहनांच्या मनाला पटणारे नव्हते. काहीही करून हे संस्थान वाचवावे अशी त्यांची तीव्र इच्छा होती.



त्याकाळी खेड्यापाड्यातील वेगवेगळ्या भागांत जेव्हा इंग्लिश डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट दौऱ्यावर जात, तेव्हा त्यांच्याबरोबर शंभरेक लोकांचा ताफा असे. कितीही कडक सामाजिक आणि आर्थिक निर्बंध असले तरी या सर्वांना खूष ठेवण्याची, त्यांची मर्जी राखण्याची जबाबदारी दिवाणसाहेबांवर असे. फकीरमोहन यांनीही ही तयारी करून ठेवली होती. पन्नास मैलांवर असलेल्या कटक शहरातून त्यांनी अगदी भाजीपाल्यापर्यंतच्या सर्व वस्तू मागवून ठेवल्या होत्या.

पण भरीस भर म्हणून दुर्दैवाने त्याचवेळी पावसाला सुरुवात झाली. पावसाने आणि वाढत्या गारठ्याने एकमेकांशी संपर्क करणेही कठीण होऊ लागले. बहिष्कार घालणारे लोक किंवा इस्टेटीतील सेवकमंडळी यांच्यापैकी कुणीच बाहेर पडेनासे झाले. बिचारे फकीरमोहन एकटेच पावसापाण्यात, वादळवाऱ्यात आणि चिखलात फिरत होते, मॅजिस्ट्रेटच्या स्वागताची तयारी नीट होते आहे ना हे पाहत धडपडत होते.

हे सर्व करताना फकीरमोहनांच्या राजकीय पातळीवरच्या हालचालीदेखील चालू होत्या. कुठल्याही प्रकारच्या मार्गाचा अवलंब करून बंडखोर जमीनधारकांपैकी काहीजणांना तरी राजाच्या बाजूने वळवून घेण्याच्या प्रयत्नात ते होते. सरतेशेवटी थोड्याफार जणांना तरी असे वळविण्यात आपल्याला यश येते आहे असे त्यांना वाटू लागले. पण त्यांचा तो भ्रम लवकरच दूर झाला. एक दिवस गावप्रमुख आणि जमीनधारकांचे नेते यांची दुपारी अडीच वाजता डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटशी त्यांच्या कॅम्पवर भेट ठरली. ज्यांना आपण वळवून घेतले आहे असे फकीरमोहन समजत होते त्या लोकांना ते सकाळभर भेटत होते. साहेबांनी प्रश्न विचारले तर त्यांना काय उत्तरे द्यायची हे ते समजावून सांगत होते.

दुपारी चारचा सुमार होता. वादळ आता थोडे शमले होते; पण पाऊस अद्यापही चालूच होता. ओरिसाच्या त्या घनदाट जंगलांनी वेढलेल्या गावात बीम्स कसाबसा आपला वेळ घालवत होता. मुळातच अभ्यासू वृत्तीचा असल्याने तो आपला वेळ भाषाशास्त्र या आपल्या आवडत्या विषयावर चिंतन करण्यात घालवत होता. गावातील दोन्ही गटांच्या तक्रारी, प्रतितक्रारी, त्यावरचे वादविवाद यांसारख्या कंटाळवाण्या गोष्टी ऐकण्यात त्याला अजिबातच रस नव्हता. फकीरमोहन आणि इतर भूमीधारक त्याला भेटायला आले तेव्हा तो मोठ्या अनिच्छेनेच बाहेर आला. अंगाभोवती त्याने एक जाडसर ब्लँकेट लपेटले होते.

मॅजिस्ट्रेटकडून आलेल्या हुकूमाप्रमाणे चपराश्याने एकाएका ग्रामप्रमुखाचे नाव पुकारले. आपापले आडोसे सोडून ते सर्व मॅजिस्ट्रेटच्या तंबूसमोर एका ओळीत उभे राहिले. फकीरमोहन जेव्हा बाहेर डोकावले तेव्हा सकाळी त्यांनी पढवून तयार केलेल्या भूधारकांपैकी एकही जण त्यांना तेथे दिसला नाही. विरुद्ध पार्टीच्या पुढाऱ्यांनी त्यांना बहुतेक कुठेतरी डांबून ठेवले असावे, हे फकीरमोहनांच्या लक्षात आले.

त्या थंडगार शिरशिरणाऱ्या वातावरणात फार काळ थांबण्याची बीम्सची इच्छा नव्हती. केव्हा एकदा आतल्या उबदार वातावरणात जातो अन् स्वत:ला भाषाशास्त्राच्या अभ्यासात बुडवून घेतो असे त्याला झाले होते. त्यामुळे बाहेर जमलेल्या गर्दीला उद्देशून आपल्या हिंदीमध्ये तो म्हणाला – "दोमपाड्यातील भूधारकांनो, तुमचं राजाशी जे काही भांडण आहे, ज्या काही तक्रारी आहेत त्यावर दिवाण फकीरमोहनांनी विचार करून मार्ग काढावा असे मला वाटते. तुम्हाला हे मान्य आहे का?" त्यावर उपस्थित गावप्रधानांपैकी एका गटाने त्यांना ओरडून विचारलं – "दिवाणांनीच जर हे भांडण सोडवायचं होतं तर तुम्हाला या अशा घाणेरड्या पावसाळी वातावरणात कटकहून इतक्या दूर येण्याची काय गरज होती?"

बीम्सने पौर्वात्य भारतीय भाषांचा अभ्यास केला होता हे जरी खरे असले तरी आपल्या खास ग्रामीण ढंगात प्रधान जे बोलले त्याचा अर्थ त्याला फारसा उमगला नाही. तो आपल्या ओरिया–शिक्षकाकडे म्हणजेच फकीरमोहनांकडे वळून म्हणाला, "काय म्हणताहेत हे लोक?"

त्याच्या प्रसंगावधानी गुरूने तत्परतेने उत्तर दिले, "ते म्हणताहेत की दिवाणबाबू आमचे सर्व प्रश्न सोडवू शकतात. साहेबांनी इतका त्रास घेऊन इथं येण्याची खरंच काही गरज नव्हती."

फकीरमोहनांचे बोलणे ऐकून बीम्स खूष झाला. भेटीचा समारोप करीत तो म्हणाला, "छान! छान! तुमचे नवीन दिवाण अतिशय हुशार आहेत. माझा त्यांच्यावर पूर्ण विश्वास आहे. ते तुमचे सगळे प्रश्न नक्कीच सोडवतील. ठीक आहे! नमस्कार!"

या सगळ्या प्रकाराने साहजिकच जमलेल्या लोकांमध्ये गोंधळ उडाला. "इतके करून काय झालं? या साहेबाला आमच्या प्रश्नातलं समजतंय तरी काय?" असे ते आपापसात कुजबुजू लागले. पण बाजी आधीच पलटली होती. अतिशय अभ्यासू आणि यशस्वी शाळामास्तर म्हणून गाजलेल्या फकीरमोहनांचे एक नवीनच रूप इथे पाहायला मिळाले. एका कुशल प्रशासकाचे रूप! मॅजिस्ट्रेटच्या तोंडून वरील आदेश बाहेर पडताच त्यांनी कॉन्स्टेबल्सना बोलावले आणि बंडखोर ग्रामप्रमुखांना आणि त्यांच्या पित्त्यांना तेथून बाहेर काढले. साहेबांसमोर पुन्हा तोंड उघडण्याची संधीच त्यांनी ग्रामप्रमुखांना दिली नाही. अशा रीतीने ही मीटिंग संपली.



पण हवामान खराब असल्याने बीम्सचे कटकला जाणे लांबणीवर पडले. तो इस्टेटीतल्या इतर गावांच्या दौऱ्यावर गेला. त्यामुळे फकीरमोहनांसमोर मात्र एक अडचण अनपेक्षितपणे उभी राहिली. मॅजिस्ट्रेट आणि त्याच्या लवाजम्यासाठी मागविलेली खाण्यापिण्याची सामग्री संपून गेली होती. स्थानिक लोकांकडूनच आता नव्याने सगळे सामान आणणे भाग होते. सगळ्यात पहिल्यांदा दुसऱ्या दिवशी सकाळसाठी दूध आणि तूप आणायला सांगायचे होते, पण दूधवाले कुठे दिसत नव्हते. कसाबसा दुसऱ्या दिवशी सकाळी बऱ्याच वेळाने एक दूधवाला उगवला. हेतुपुरस्सर उशिरा आलेल्या या दूधवाल्याला पाहून त्यांना राग आवरेना. त्याने थोडेसे दूध आणि तूप आणून दिले. बीम्सच्या कॅम्पजवळ असलेल्या एका भूमीधारकाच्या घराच्या व्हरांड्यात फकीरमोहन बसून होते. बाहेर पावसाची बुरबुर चालूच होती. सगळे रस्ते चिखलाने निसरडे झाले होते. त्या चिखलात एक मोठा लाकडाचा ओंडका पडला होता. फकीरमोहनांच्या दृष्टीला तो पडला. त्यांनी ताबडतोब दोन कॉन्स्टेबल्सना बोलावले आणि त्या गवळ्याला त्या ओंडक्याला बांधून ठेवण्याची आज्ञा दिली. एकाला त्याच्या डोक्यावर दही-दूध ओतण्याची आज्ञा दिली तर दुसऱ्याला आपण थांब म्हणेस्तोवर त्याला केनचे फटके मारण्यास सांगितले.

कॉन्स्टेबल्सनी आपले काम जोरात सुरू केले. ज्याला शिक्षा झाली होती त्या गवळ्याचे भाऊबंद एकाएकी प्रगट झाले आणि सर्वच्या सर्व फकीरमोहनांसमोर जमिनीवर पालथे पडले अन् एका सुरात विनवू लागले, "अहो देवा, तुम्ही साक्षात न्यायदेवता आहात. दया करा! याला सोडवा. तुम्ही म्हणाल तितकं दूध-तूप आम्ही तुम्हाला पुरवू. पण कृपा करा, याला सोडवा!"

लकडीशिवाय मकडी वळत नाही हेच खरे! चांगले समजावून सांगून जे जमले नाही ते या रानटी मार्गाने साध्य केले. पुढच्या अर्ध्या तासात दुधातुपाच्या घागरी घेऊन गवळी साहेबांच्या सेवेला हजर झाले. लगोलग मासे आणि इतर सामग्रीही येऊन दाखल झाली, अन् तीही कल्पना करता येणार नाही इतक्या मोठ्या प्रमाणात होती. असहकार, विरोध आणि भाडेपट्टी देण्याला नकार या धोरणाचा या एका घटनेने फज्जा उडाला. एक अतिशय घट्ट बसलेली निरगाठच जणू फकीरमोहनांनी अलगद सोडवली होती.

'यशासारखं यशस्वी काही नसतं' असं म्हणतात. वाऱ्याची बदलती दिशा लक्षात घेऊन फकीरमोहनांनी त्याच वेळी बीम्ससमोर काही फौजदारी केसेस सादर केल्या. या केसेस ग्रामप्रमुखांच्या पुढाऱ्यांविरुद्ध होत्या. त्यातला दयानिधी पट्टनायक तर माजी दिवाणाचा पुतण्या होता. लोकांचे हे जे तथाकथित असहकारिता आंदोलन चालू होते, त्या मागचा बोलविता आणि करविता धनी तोच होता. शेवटचा प्रयत्न म्हणून हे सर्व आंदोलनकर्ते पुन्हा एकदा साहेबांची गाठ घेण्यासाठी साहेबांच्या

कॅम्पकडे निघाले आहेत ही बातमी फकीरमोहनांच्या कानावर लगेच आली अन् त्यांनी पुढची चाल आखली. ज्यांच्यावर फौजदारी केसेस होत्या त्या ग्रामप्रमुखांच्या नावाची वॉरंटस् घेऊन कॉन्स्टेबल्सना त्यांनी तडक पुढे रवाना केले. सेनापतींचे शिपाई नदीच्या शुष्क पात्रापर्यंत पोहोचतात तोच त्यांना नदी ओलांडणारा हा लोकांचा जथ्था दिसला. वेळ न दवडता त्यांनी वॉरंट असलेल्या लोकांच्या हातात बेड्या ठोकल्या. क्षणभर सगळे जण धक्का बसल्याप्रमाणे स्तंभित झाले अन् दुसऱ्याच क्षणी हताशेने अन् जिवाच्या भीतीने सैरावैरा इतस्ततः धावू लागले. त्याच क्षणी ते बंड म्हणा, आंदोलन म्हणा, संपले!

दोमपाड्यात आता शांतता नांदत होती. फकीरमोहनांनी आता तडजोडीच्या दृष्टीने हालचाली सुरू केल्या. राजाही आता खुषीत होता. आयुष्यभर फकीरमोहनांनाच दिवाण म्हणून ठेवून घ्यावे अशा विचारात होता. निवृत्तीनंतर त्यांना चांगली भरघोस पेन्शन देण्याची त्याची तयारी होती. कमिशनरसमोर तसा प्रस्तावही त्याने मांडला होता. पण त्या दूरदृष्टीच्या सरकारी ऑफिसरने फकीरमोहनांना, राजाच्या या भूलथापांनी हुरळून न जाण्याचा इशारा दिला अन् या उलट फकीरमोहनांच्या जन्मगावची, म्हणजे धेनकाल्याची असिस्टंट मॅनेजरची जागा स्वीकारण्याचा जो प्रस्ताव आला होता तो स्वीकारण्याचा सल्ला त्यांना दिला. ती जागा कोर्ट ऑफ वार्डस्च्या व्यवस्थापनाखाली होती. पगारात भरघोस वाढ होणार होती, तशीच प्रतिष्ठेतही!

अशा रीतीने फकीरमोहनांनी राजा आणि प्रजा यांच्यातली ही जटिल समस्या आपल्या पद्धतीने पण कुणाच्याही प्रतिष्ठेला धक्का न लावता सर्वमान्य होईल अशा प्रकारे सोडवली. एक यशस्वी दिवाण म्हणून एक दिवस फकीरमोहनांनी दोमपाडा सोडले. तिथून निघण्यापूर्वी त्यांनी माजी दिवाण, दयानिधी पट्टनायक आणि इतर ग्रामप्रमुखांना नुकसानभरपाईही दिली. ते सर्व जरी या जनआंदोलनामागचे सूत्रधार असले तरी तडजोड घडवून आणण्यासाठी फकीरमोहन यांनी ज्या काही मार्गांचा अवलंब केला होता, त्यात या मंडळींना जरा जास्तच कठोरपणे वागविण्यात आले होते असे फकीरमोहनना वाटत होते. फकीरमोहन यांची सर्वसमावेशक वृत्ती अन् पारदर्शी मानवतावादी मन यांचेच दर्शन त्यांच्या या कृतीतून आपल्याला घडते.

***

# 7

# मिलीशियाचा लष्करप्रमुख (कमांडिंग ऑफिसर)

आज केन्दुझार हा ओरिसा राज्यातला एक जिल्हा आहे. पण पूर्वी तो एक स्वतंत्र राज्य गणला जायचा. भन्जा हे त्या राज्याचे शासक होते. मध्ययुगीन ओरिया काव्यात उत्तम कवी म्हणून मान्यता पावलेले उपेन्द्र भन्जा हे या शासकांचे वंशज होते. मयूरभन्ज येथील प्रख्यात भन्जांची एक शाखा केन्दुझार येथे राज्य करीत होती. त्यांनी ओरिया साहित्यात आणि संस्कृतीत फार मोलाची भर टाकली होती.

1887 मध्ये फकीरमोहन केन्दुझार येथील राज्य शासनात मॅनेजर म्हणून रुजू झाले. त्या वेळी ते अवघे 45 वर्षांचे होते. माणसाच्या कर्तबगारीचा आणि सळसळत्या तारुण्याचा हा बहराचा काळ असतो. या संस्थानचे राजे महाराजा धनंजय भन्जा हे एक सुशिक्षित अन् कुशल शासक होते. त्यांनी उभे केलेले सिंचन प्रकल्प आजही त्यांच्या कुशल प्रशासनाची आणि प्रजेविषयीच्या त्यांच्या हितकारी दृष्टीची साक्ष देतात.

## राजे घडविणारे भूयन

भूयन लोक हे केन्दुझारचे मूळचे रहिवासी! प्रगतिशील दृष्टीचा धनंजय नारायण भन्ज यांनी धरणीधर नावाच्या भूयन जमातीच्या एक तरुणाला कटक येथे कॅडास्ट्रल सर्व्हे (पैमाषी)च्या ट्रेनिंगसाठी पाठवले होते. त्याचा सर्व खर्च शासनाने केला होता. ट्रेनिंग पूर्ण होताच त्याची नेमणूक त्यांनी प्रोबेशनरी सर्व्हेयर म्हणून केली.

त्या काळी ओरिसात जवळजवळ प्रत्येक क्षेत्रात वेठबिगारीची वाईट प्रथा अस्तित्वात होती. दरवर्षी प्रत्येक कुटुंबाला काही दिवस तरी राज्यासाठी विनामोबदला काम करावेच लागत असे. यात सर्वांत जास्त भरडले जात ते गरीब कामकरी लोक! बहुतेक वेळा घरातली वडीलधारी वृद्ध मंडळी अशा कामासाठी पुढे येत असत. कारण कुटुंब चालविण्यासाठी पैसा कमावणे ही तरुण मंडळींची जबाबदारी असे. या वृद्धांना आपापली कामाची हत्यारे, डाळ–तांदळाचा शिधा घेऊन कामाच्या ठिकाणी जावे लागत असे. दिवसभराच्या कमरतोड कामानंतर तिथेच उघड्यावर तीन विटांची चूल मांडून स्वयंपाक करावा लागत असे अन् तसेच उघड्यावर पथारी पसरून झोपावे लागत असे.

राज्यातील इतर जातीजमातींप्रमाणे भूयन लोकांनाही ही अमानुष वागणूक सहन करावी लागत असे. ब्राह्मण वर्ग, बऱ्या परिस्थितीमधले लोक आणि अधिकारीवर्ग यांना मात्र यातून सूट असे. केन्दुझार येथे एक बिचित्रानंद दास नावाचा असिस्टंट मॅनेजर होता. त्याने तर नदीवर बांधल्या जाणाऱ्या एका छोट्या धरणाच्या कामावर फक्त भूयन लोकांचीच भरती केली होती अन् त्यांना तो अत्यंत वाईट पद्धतीने वागवत होता. त्यांना तो उपाशीपोटी काम तर करायला लावतच होता, पण आपल्या चाबकाचा मुक्त वापरही तो त्यांच्यावर करत होता. त्यामुळे मुळात अतिशय संवेदनशील असलेले हे भूयन वरून शांत दिसत असले तरी आतून धुमसत होते. कोणी पुढारी मिळायचीच वाट होती की ते राजाविरुद्ध लढाईत उतरायला एका पायावर तयार होते. धरणीधर हा त्यांच्याच जमातीचा युवक होता, तो कटकहून शिकून आला होता. त्याच्या रूपाने भूयनना अनायसेच एक पुढारी मिळाला होता.

एकेकाळी या राज्यावर आपली सत्ता होती ही गोष्ट भूयन विसरू शकत नव्हते. हिंदूंनी आपल्याला फसवले अन् राज्यातील या कोपऱ्याच्या प्रदेशात, या बंजर पहाडी भागात ढकलले आहे ही गोष्ट त्यांच्या मनातून जात नव्हती. जुन्या काळी केन्दुझार हा शेजारच्या मयूरभंज राजाचा भाग होता. पण राज्याची राजधानी इतकी दूर होती की आपली राजनिष्ठा प्रगट करण्यासाठी इतक्या दूरवर जाणे भूयन लोकांना जमत नव्हते. म्हणून त्यांनी एकदा मयूरभंज घराण्यातील एका राजकुमाराला पळवून आणले होते आणि त्यालाच आपला राजा म्हणून घोषित केले होते. राजा म्हटला की त्याला स्वारीसाठी घोडा किंवा हत्ती लागणार, पण भूयन लोकांकडे तर ना हत्ती होता ना घोडा! मग एक भूयन प्रमुख पुढे झाला आणि आपल्या हातापायांवर राजासमोर ओणवा झाला. राजाला त्याच्या पाठीवर बसवले गेले. राजाला उच्चासनी बसवून त्याला प्रतीकात्मकरीत्या का होईना पण सार्वभौमपद देण्यात आले. नंतर दुसऱ्या एका भूयन पुढाऱ्याने राजासमोर लोटांगण घातले अन् त्या तरुण राजाने आपल्या तलवारीचे टोक त्याच्या मानेला लावले. याचा अर्थ असा होता की, भूयन जमातीपैकी ज्याने कुणी चूक केली आहे असे राजाला वाटेल त्याला हवे ते शासन करण्याचा पूर्ण अधिकार राजाला दिला गेला होता. आजही जेव्हा जेव्हा केन्दुझारच्या नवीन राजाचा राज्याभिषेक होतो तेव्हा या प्रतीकात्मक चाली आवर्जून पाळल्या जातात. त्यामुळे एखाद्याला केन्दुझारचा राजा करणे किंवा न करणे हा फक्त आपला अधिकार आहे, ही आपलीच जबाबदारी आहे असा या भाबड्या भूयन लोकांचा समज झाला होता. दुसरा कुणी त्यांच्याच भूमीत त्यांच्या अधिकारांवर आक्रमण करण्याचे धाडस कसे करू शकतो, असे त्यांना वाटत होतं.

## बहाणेबाज

कटकमध्ये शिकताना धरणीधराच्या मनात देशभक्तीसोबत प्रगतिशील विचारांचे बीजही पेरले गेले होते. राज्याच्या सीमेलगत असलेल्या सिंहभूम नावाच्या ब्रिटिश



राज्याच्या अधिकाऱ्यांशी त्या वेळी सीमेबाबत काही बोलणी सुरू होती. धरणीधर आपल्या राज्याच्या अधिकाऱ्यांना या कामात मदत करत होता. त्याच वेळी त्याच्या कानावर त्याचा भाऊ गोपाल आणि इतर काही नातेवाईकांना राजाने पकडले असून ते सध्या तुरुंगात डांबले गेले असल्याची बातमी आली. त्याने तात्काळ आपली नोकरी सोडली अन् तो तिरीमिरीने आपल्या आदिवासी क्षेत्राकडे रवाना झाला. तिथे तो स्वत:ला 'महाराणीचा दत्तकपुत्र' म्हणवून घेऊ लागला. आपल्या नावाचा तसा सहीशिक्कादेखील त्याने तयार केला. त्याच्या जमातीचे शेकडो लोक त्याच्याभोवती जमा झाले. ते सर्व धनुष्यबाणांनी सज्ज होते आणि लढाईला केव्हाही तयार होते. राज्याच्या सीमावर्ती भागातील काही कोठारांवर आणि काही पोलीस चौक्यांवर छुपे हल्ले करून त्यांनी बरेचसे धान्यधुन्य आणि थोडी शस्त्रास्त्रे मिळवली होती. त्यांच्या जोरावर ते दीर्घकाळ जंगलांमध्ये लपून राहू शकत होते.

फकीरमोहन आपला दिवाणगिरीचा कारभार केन्दुझार राजवाड्यामधून न चालवता आनंदपूरहून चालवत असत. आनंदपूर हे राज्यातील दुसऱ्या क्रमांकाचे शहर होते. राज्याकडे येणारा मुख्य पैशाचा ओघ याच शहरामधून येत असे. फकीरमोहनांच्या कानावर ज्याक्षणी भूयन लोकांच्या बंडाची बातमी आली तत्क्षणी त्यांनी आपले असंख्य हेर, रनर्स केन्दुझारगट आणि आनंदपूर शहर यांच्यामधील रस्त्यांवर पसरवले. बंडखोरांची बारीकातली बारीक हालचालही आपल्या कानी पडावी अशी व्यवस्था त्यांनी केली. बंड सुरू होऊन जेमतेम तीन दिवस होतात न होतात तोच एका रात्री महाराज आपल्या लवाजम्यासकट कटकला निघून गेले. बिचाऱ्या राण्यांना त्यांनी त्या एकाकी राजवाड्यात देवाच्या भरवशावर सोडून दिले. ही बातमी ऐकून फकीरमोहन तर स्तंभितच झाले.

पण दुसऱ्याच क्षणी त्यांनी राज्यातील सैन्यदलाला एकीकडे बंडखोरांचा बंदोबस्त करण्यासाठी रवाना केले अन् स्वत: राजाची समजूत घालण्यासाठी कटकला रवाना झाले. सरकारकडून आणखी लष्करी साह्य मिळविण्यासाठीही त्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. अखेर सरकारचा होकार आणि महाराजांना घेऊन त आनंदपूरला परत आले. राज्याचे सैनिक तेथे आधीच जमले होते. या सैन्यात आघाडीवर एका हत्तीवर त्यांनी महाराजांना बसवले. सैन्याच्या पिछाडीला एका दुसऱ्या हत्तीवर स्वत: फकीरमोहन स्वार झाले. आदिम काळातील सैन्याप्रमाणे बंडखोरांचे अनपेक्षित हल्ले चुकविण्यासाठी रात्रीच्या अंधाराचा फायदा घेत हे सैन्य राजधानीकडे कूच करते झाले.

## गंज चढलेले सैन्य

राजधानीकडे सैन्याने कूच केले त्याच्या दुसऱ्याच दिवशी बातमी आली की, बंडखोरांनी राजवाड्यावर कब्जा मिळवला. भयभीत झालेले महाराज पुन्हा कटकला पळून गेले, पण ते जाण्यापूर्वी फकीरमोहनांनी मोठ्या हुशारीने त्यांच्याकडून आपल्या

नावे मुखत्यारपत्र लिहून घेतले होते. त्या अधिकारपत्रानुसार स्वसंरक्षणासाठी किंवा राजवाड्यातील स्त्रियांच्या अब्रूरक्षणासाठी भूयनांना ठार करण्याचा अधिकार त्यांनी मिळवला होता.

'सेनापती' हे आडनाव धारण करणाऱ्या फकीरमोहन यांनी आता खरोखरच नावाप्रमाणे सैन्याच्या आघाडीची कमांडिंग ऑफिसरची जागा घेतली. अनपेक्षितपणे खांद्यावर पडलेली ही जबाबदारीही त्यांनी अतिशय कुशलतेने पार पाडली. सैन्याच्या प्रत्येक मुक्कामी ते सैनिकांकडून आधुनिक पद्धतीने कवायत करून घेत असत अन् स्वत: जातीने त्यांच्या हत्यारांची तपासणीही करत असत. खरे तर या सर्व प्रकाराचा त्यांना मानसिक धक्काच बसला होता. पण त्यांनी त्याचा कुणाला मागमूसही लागू दिला नाही. सैन्यातील बहुतेक सैनिक प्रौढ वयाचे होते. मराठ्यांच्या काळात त्यांच्यापैकी काहीजणांचे आजे-पणजे सैन्यात असावेत. त्यांनी काय ती थोडीफार लढाई केली असेल तेवढीच. गेल्या शंभरपेक्षा जास्त वर्षांत ते सर्व पॅक्स ब्रिटानिकाच्या (ब्रिटिश शांतिसेनेच्या) आधिपत्याखाली होते. या काळात एकदाही लढाईची वेळ न आल्याने त्यांच्या तलवारी गंज लागलेल्या स्थितीत म्यानात पडून होत्या. त्यांची जन्मजात युद्धकौशल्येही उपयोगात न आल्याने गंजून निरुपयोगी झाली होती. शिवाय या मोहिमेचा आदेश त्यांना इतका अचानक मिळाला होता की निघण्यापूर्वी आपल्या बंदुका चालतात की नाही हे पाहण्याची संधीही त्यांना मिळाली नव्हती. घाईघाईत आवश्यक तेवढा दारूगोळा घेणेसुद्धा त्यांना जमले नव्हते, अशी त्यांच्यापैकी बहुतेकांची तक्रार होती.

पण अशा प्रकारच्या तक्रारींनी किंवा विदारक परिस्थितीने विचलित होणाऱ्यांपैकी फकीरमोहन नव्हते. अशाच सैन्यासह ते धैर्याने आगेकूच करत राहिले. अर्थात त्यांच्या सैनिकांमध्ये असेही काही सैनिक होते की जे आपल्या गंजलेल्या तलवारींचे पाणी सबंध भूयन जमातीला पाजायला उत्सुक होते. आपल्या सेनापतीसमोर ते तसे वारंवार बोलूनही दाखवत असत. फकीरमोहनही या सर्व गोष्टींमध्ये मनापासून रस घेत असत. त्याच वेळी या सूक्ष्म निरीक्षणातून मानवी स्वभावातील धागेदोरे धुंडाळण्याचा प्रयत्न त्यांचे मन करीत असे. या विविध प्रकारच्या प्रसंगांमधून त्यांच्या मनात उतरलेली पात्रे पुढे त्यांच्या कथा-कादंबऱ्यांमधून अतिशय रसरशीतपणे वाचकांसमोर आली.

## यशस्वी माघार

भूयन्सनी प्रत्यक्ष राजवाड्यावर कब्जा केलेला नसून ते राजवाड्याच्या पिछाडीला असलेल्या टेकड्यांपलीकडच्या रायसौना नावाच्या खेड्याजवळ जमले आहेत अन् कोणत्याही क्षणी ते राजवाड्यात घुसतील अशी बातमी राजधानीजवळ पोचता पोचता फकीरमोहनांच्या कानावर आली. बंडखोरांना त्यांच्या छुप्या जागी गाठून त्यांचा दुष्ट बेत हाणून पाडायचा असे फकीरमोहनांनी ठरवले. त्यांची संख्या आणि तयारी यांचा अंदाज घेण्यासाठी त्यांनी प्रथम काही स्काऊटस्ना तिकडे पाठवले. पण या स्काऊटस्नी फकीरमोहनांना दगा दिला. त्यांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून ते अनिच्छेने का होईना पण पुढे पुढे गेले अन् बंडखोरांनी वेढलेल्या प्रदेशात अलगद अडकले. रायसौनाची खिंड पार करत असताना दोन्ही बाजूंच्या टेकड्यांवरून अचानकपणे त्यांच्या सैन्यावर धुवाँधार गोळीबार होऊ लागला. सकाळच्या स्वच्छ सूर्यप्रकाशात झाडाझुडपांच्या आड लपलेले बंडखोर फकीरमोहनांना दिसत होते. काहींच्या हातात धनुष्यबाण होते तर काहींच्या हातात गावठी बंदुका होत्या. आता पुढे काय करावे या विचारात फकीरमोहन होते तोच सूं सूं करत एक बाण आला अन् त्यांच्या मानेला चाटून गेला. एखाद्या सुताचा जरी फरक पडला असता तरी त्यांचे मस्तक धडावर राहते ना. शत्रूची एकूण संख्या अन् मुख्य म्हणजे लढाईची जागा शत्रूला अनुकूल आहे हे लक्षात येताच फकीरमोहनांनी यशस्वी माघार घेण्याचे ठरविले. अनावश्यक असा रक्तपातही त्यामुळे टाळला गेला असता.



## क्लृप्त्यांची लढाई

लढाईतून माघार घेणे हाच त्या परिस्थितीत शहाणपणाचा मार्ग होता. फकीरमोहनांनी त्यामुळे तो निवडला. पण धूर्त फकीरमोहन शांत मात्र बसले नाहीत. त्यांनी गनिमी कावा लढवायला सुरुवात केली. धरणीधर हा त्या वेळी केन्दुझारचा नामधारी किंवा स्वघोषित राजा होता. फकीरमोहन यांना पकडून या धरणीधरासमोर आणले गेले. मॅनेजर फकीरमोहन धरणीधराला चांगलेच ओळखत होते. त्याने त्यांच्या हाताखाली पूर्वी सर्व्हेयर म्हणून कामही केले होते. परिस्थितीचा कल पाहून फकीरमोहनांनी आपला पवित्र बदलला. 'आपण आपल्या कुटुंबाचे एकुलते एक पोशिंदे असल्यामुळे नवीन महाराजांच्या पदरी दिवाणाचे काम करायला आपण तयार आहोत' – असे त्यांनी धरणीधरासमक्ष कबूल केले.

इतक्या मोठ्या राज्याचा कारभार आपण एकटे सांभाळू शकत नाही हे धरणीधराला चांगलेच ठाऊक होते. काही उत्तम आणि जाणकार अधिकाऱ्यांची नेमणूक तात्काळ करणे त्यामुळे आवश्यक होते. त्याने तसे आपल्या लोकांना सांगितलेही होते आणि आता इथे त्याच्या समोर राज्यकारभाराची इत्थंभूत माहिती असलेला दिवाण प्रत्यक्षपणे उभा होता. त्याची नेमणूक करायला काय हरकत होती? भूयन्स लोकांच्या मनात ऑफिसर्स लोकांबद्दल कायम एक किंतू होता. त्यामुळे त्यांनी आपल्या राजाच्या या विचाराला सहमती दिली खरी पण ती फारशी मनापासून नव्हती. फकीरमोहनांना हे पूर्णपणे ठाऊक होते. या लोकांचा विश्वास संपादन करण्यासाठी त्यांनी कागदी घोडे नाचविण्याची जुनीच क्लृप्ती अवलंबिली; अन् त्यांना महाराजांच्या वाड्यावर हल्ला

करण्यापासून परावृत्त केले. प्रतिपक्षाची चाल ओळखून त्यावर मात करण्याचे त्यांचे अपूर्व कसब या वेळी कामी आले. राजवाड्यावर हल्ला करायचा तर त्यासाठी आधुनिक शस्त्रसामग्री हवी, अधिक व्यवस्थित योजना आखायला हवी हे त्यांनी त्या लोकांच्या गळी उतरवले. एका क्षणात राजवाड्याचा धुव्वा उडेल अशी नामी योजना आपल्याजवळ आहे असा विश्वास त्यांच्या मनात फकीरमोहनांनी निर्माण केला अन् तूर्तास राजवाड्यावर हल्ला करण्याचा त्यांचा बेत त्यांना पुढे ढकलायला लावला. उगाचच्या उगाच धनुष्यबाणांचे युद्ध, युद्धातला रक्तपात, जिवांची हानी हवी तरी कशाला? हे त्या आदिवासींना पटले. फकीरमोहनांनी सांगितल्याप्रमाणे कलकत्त्याहून येणाऱ्या स्फोटकांची ते वाट पाहू लागले.

फकीरमोहनांना सतत पानाचा विडा चघळण्याची सवय होती. धरणीधरालाही तीच सवय होती. 'समानशीले व्यसनेषु सख्यम!' या नात्याने ते एकमेकांच्या अधिकच जवळ आले. अधिक पानांचा पुरवठा करावा अशी मागणी करणारे पत्र पाठवत आहोत या सबबीखाली फकीरमोहनांनी एक सांकेतिक निरोप महाराजांकडे पाठवला. महाराजांनी त्वरित लष्करी हल्ला करावा असे त्यात कळवले होते. 16 मे 1891 रोजी लिहिलेले हे पत्र कुणाएका तथाकथित भोलानाथ नामक फकीरमोहनांच्या कारभाऱ्याच्या नावे लिहिले असले तरी प्रत्यक्षात ते एका राज्यअधिकाऱ्याला उद्देशून लिहिले होते. ते पत्र बाकायदा धरणीधराच्या नजरेखालून गेले होते. पत्रातील मजकूर असा होता – 'माझे एजन्ट भोलानाथ यांच्या माहितीस्तव मुद्दाम कळवत आहे की, महाराणींच्या मुलाला ताबडतोब कमीत कमी 100 पाने आणि 200 सुपाऱ्या हव्या आहेत. कसेही करून कृपया त्वरित पाठवाव्यात. माझ्या उसाच्या शेताला पाणी देण्यासाठी उत्तर दिशेला एक खंदक खणावा नाहीतर उसाचे पीक लवकरच जळून जाईल.'

हे पत्र वायरच्या तीन तुकड्यांनी बांधले गेले होते. सगळ्यांचे नशीब जोरावर होते म्हणायचे, कारण त्या अधिकाऱ्याला सेनापतींच्या संदेशातील सांकेतिक अर्थ समजला होता. पाने म्हणजे सैनिक अन् सुपाऱ्या म्हणजे बंदुका हा गर्भितार्थ त्याच्या लक्षात आला. खलिता तीन वायर्सनी गुंडाळला होता. त्यामागील संकेत लक्षात येऊन त्याने वेगवेगळ्या अधिकाऱ्यांशी संपर्क साधून त्यांना परिस्थितीच्या गांभीर्याची कल्पना दिली, अन् आवश्यक ती लष्करी मदत करण्याची त्यांना विनंती केली. हे सगळे बिलकूल वेळ न गमावता केले गेले अन् एका भल्या पहाटे लष्करी तुकड्यांनी धरणीधराच्या गुप्त ठिकाणांवर धाड घालून धरणीधर आणि त्याच्या साथीदारांना अटक केली. धरणीधराला दीर्घ मुदतीची सक्तमजुरीची शिक्षा झाली अन् त्याची रवानगी तुरुंगात करण्यात आली. बिचाऱ्या धरणीधराचे केन्दुझारचा राजा होण्याचे स्वप्न कायमचे नेस्तनाबूत झाले.

***

# 8

# घराचा नरक व दुसऱ्या पत्नीचा स्वर्ग

फकीरमोहनांचे वैयक्तिक आयुष्य मोठ्या चढउतारांनी भरलेले होते. कधी कधी तर ते त्यांना शुष्क वाळवंटाप्रमाणे दाहक वाटत होते. एक माणूस किंवा व्यक्ती म्हणून ते कायम एकाकीच राहिले. त्यांच्या या वैराण आयुष्यात दोन स्त्रियांच्या रूपाने थोडा काळ का होईना पण थोडा ओलावा, वाऱ्याची गार झुळूक आली होती. मात्र फकीरमोहनांच्या कर्तृत्वाला बहर येतो न येतो तोच या दोन्ही स्त्रिया त्यांना पुन्हा पोरके करून निघून गेल्या होत्या अन् फकीरमोहन पुन्हा एकदा एकाकीपणाच्या गडद काळोखात लोटले गेले होते. फकीरमोहनांच्या जागी दुसरा कुणी असता तर नक्कीच आयुष्याबद्दल कडवट झाला असता, निराशेने झाकोळून गेला असता. पण फकीरमोहन म्हणजे आयुष्याच्या असोशीचे सळसळते प्रतीक होते. काळ्याकुट्ट जीवनापेक्षा या जीवनाला असलेल्या रुपेरी कडांकडे त्यांचे लक्ष असे. स्वत: दु:खी असूनही भोवतालच्या खोडसाळ जगाकडे सकारात्मक दृष्टीने पाहण्याची, आयुष्यात समतोल साधण्याची त्यांची ही वृत्ती त्यांना त्यांच्या आयुष्यातील या दोन अशिक्षित किंवा अर्धशिक्षित स्त्रियांकडून मिळालेली मोलाची देणगी होती. फकीरमोहनांच्या कोवळ्या वयात या दोघींनी त्यांच्यावर निर्भेळ आणि नि:स्वार्थी प्रेमाची जी उधळण केली होती त्याच्या फलस्वरूप फकीरमोहनांची आजची वृत्ती होती. खरंच! बायकाच अशा प्रकारचे प्रेम करू जाणोत!

## वैवाहिक वरदान

फकीरमोहनांच्या आयुष्यात देवदूतासारख्या आलेल्या या दोन स्त्रियांपैकी एक त्यांची आजी कुशिलदेई होती तर दुसरी त्यांची दुसरी पत्नी कृष्णाकुमारी होती! वयाच्या तेराव्या वर्षीच त्यांचे लग्न जबरदस्तीने एका मुलीशी लावून देण्यात आले होते. ही मुलगी स्वभावाने अतिशय निष्ठुर होती. त्यांच्या काकूंच्या घरी ती राहत असे. सुरुवातीच्या दिवसांत या दोघींनी मिळून फकीरमोहनांचा असह्य छळ केला होता. त्यांच्यातल्या असहाय पतीने एके ठिकाणी लिहिले आहे – "बालासोर येथल्या मानिक खंबा भागात राहणाऱ्या नारायण परिंदा या गृहस्थांच्या लीलावती नावाच्या

मुलीशी माझे लग्न झाले. माझ्या वयाच्या 29 व्या वर्षापर्यंत ती माझ्या सोबत राहिली. ती स्वभावाने अतिशय कठोर, उद्धट आणि कर्कशा होती. मुख्य म्हणजे मी जे म्हणेन त्याच्या नेमके विरुद्ध वागण्यात तिला फार आनंद वाटत असे. माझ्या लहानपणी मला दीर्घकाळ एका दुर्धर रोगाने ग्रासले होते. पण त्या आजारपणातल्या वेदना काहीच वाटू नयेत इतके माझे वैवाहिक जीवन असह्य होते. मानसिक पीडेच्या त्या काळात मी सदैव एका संस्कृत श्लोकाची आठवण मनातल्या मनात करत असे. त्या श्लोकाचा अर्थ असा होता –

'ज्याच्या घरी प्रेमळ माता नाही पण पत्नी मात्र कर्कशा आहे
त्याला जंगलाची वाट अधिक चांगली माहीत असते
कारण त्याचे घर त्याला जंगलापेक्षा वेगळे वाटत नसते'

"या दु:खद काळात माझे एकमेव विश्रांतीस्थान म्हणजे माझी आजी होती. ती वारल्यावर मात्र घर म्हणजे निव्वळ नरकवास झाला. माझी पत्नी गंभीररीत्या आजारी पडली. वर्षभर उपचार केल्यानंतर डॉक्टरांनीही हात टेकले. ती बरी होऊ शकणार नाही असे त्यांनी सांगितले. शेवटचा उपाय म्हणून तिचे आईवडील तिला आपल्या गावी घेऊन गेले, पण काही उपयोग झाला नाही. ती तिथेच वारली. मी त्या वेळी पुरीला होतो."

## पाषाणहृदयी काकू

तरुण फकीरमोहनना आपल्या विचित्र स्वभावाच्या बायकोबरोबर आपल्या दुष्ट अन् क्रूर स्वभावाच्या काकूबरोबरही एका छपराखाली राहावे लागत होते. हे म्हणजे दिवसेंदिवस नरकातील आगीत होरपळल्यासारखे होते. या दोघी बायकांच्या कजागपणामुळे फकीरमोहनांना अक्षरश: वेड लागण्याची पाळी आली होती. घरात इतकी नरककळा असूनदेखील फकीरमोहनांनी एक यशस्वी शाळाप्रमुख म्हणून, एक लेखक म्हणून, अभ्यासू व्यक्ती म्हणून अन् त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे आपल्या जातीचा नेता म्हणून जो चौफेर लौकिक मिळवला त्याचे श्रेय यांच्या अंगभूत नेतृत्वगुणांना अन् त्यांच्या विजिगीषु वृत्तीला जाते.

पहिल्या लग्नाचा अन् काकूचा इतका भयानक अनुभव गाठीला असताना सुरुवातीच्या काळात फकीरमोहन दुसऱ्या लग्नाला तयार होणे कठीणच होते. पण पत्नीच्या मृत्यूनंतर हळूहळू गावातल्या बड्या बुजुर्ग मंडळींनी त्यांना दुसरे लग्न करून वंश पुढे चालवणे कसे आवश्यक आहे, वंशाला दिवा मिळाला नाही तर त्यांच्या पूर्वजांना मोक्ष कसा मिळणार नाही वगैरे वगैरे गोष्टी सांगून त्यांचे मन वळवायला सुरुवात केली. पोरक्या फकीरमोहनांच्या मनात आपल्या न पाहिलेल्या आईवडिलांबद्दल कमालीचा पूज्यभाव होता. त्यामुळे या दुसऱ्या लग्नामुळे आपल्याला सुख लागेल की नाही यापेक्षा आपल्या आईबापांच्या आत्म्यांना त्रास होऊ नये, या एकाच भावनेने त्यांनी लग्नाला होकार दिला.



## मनाच्या मरुभूमीत देवतेचा प्रवेश

हे दुसरे लग्नदेखील पाहून–सवरून ठरवलेलेच लग्न होते. एका जवळच्या नातेवाईकाच्या पत्नीने हे स्थळ सुचवले होते. ही सांगून आलेली मुलगी नवऱ्या मुलाच्या जवळजवळ अर्ध्या वयाची म्हणजे फक्त 12 वर्षांची होती. पण या अगदी कमी शिकलेल्या मुलीने, कृष्णाकुमारीने फकीरमोहनांचे पुढचे आयुष्य आपल्या प्रेमाने अगदी ओतप्रोत भरून टाकले. आयुष्यभर ज्याची वाट पाहिली तो सुखाचा ठेवा त्यांना शेवटी प्राप्त झाला. आपल्या चौथ्या पत्नीच्या, उनाच्या रूपाने चार्ली चाप्लीनला जो अपूर्व आनंद मिळाला तोच, अगदी तसाच आनंद फकीरमोहनांना कृष्णाकुमारीच्या रूपाने मिळाला. एक गोष्ट मात्र यावरून अगदी निश्चितपणे सिद्ध झाली व ती म्हणजे लग्नाच्या गाठी ब्रह्मदेव बांधतो हेच खरे! वैवाहिक आयुष्य कसे जाईल हे देखील तोच ठरवतो. बिचाऱ्या माणसाच्या हाती यापैकी काहीच नसते!

फकीरमोहनांच्या आयुष्यात कृष्णाकुमारी सोन्याच्या पावलांनी आली असे म्हणावे लागेल. कारण लग्न होऊन काही दिवस होतात न होतात तोच फकीरमोहन मागे सांगितल्याप्रमाणे निलगिरीचे दिवाण झाले. साध्या शाळामास्तराची ही उत्तुंग झेप फार मोठी अन् अनपेक्षितही होती. फकीरमोहन आणि कृष्णाकुमारी यांचे पंचवीस वर्षांचे वैवाहिक जीवन अतिशय सुखाचे गेले. त्यानंतर मात्र कृष्णाकुमारी फकीरमोहनांना दु:खाच्या सागरात लोटून निघून गेली. आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत फकीरमोहन या पत्नीवियोगाच्या दु:खातून वर येऊ शकले नाहीत. तिच्या ओल्या स्मृती ते आपल्या साहित्यातून सतत जागवीत राहिले. या स्मृतींनी तमाम रसिक वाचकांच्या डोळ्यांच्या कडा ओलावल्या.

## त्यांची पूज्य आजी

निर्दयी काका आणि दुष्ट काकू यांच्या आश्रयाने राहणाऱ्या अन् सदा आजारी असलेल्या फकीरमोहनांना त्यावेळी एकच आधाराचे स्थान होते. ते म्हणजे त्यांची आजी! त्यातल्या त्यात एक गोष्ट चांगली झाली म्हणावी लागेल ती म्हणजे या कष्टाळू बाईने जे कष्ट उपसले त्याचे फळ तिला मिळाले. कधी स्वप्नातही कल्पना केली नव्हती इतका आपला नातू मोठा झाल्याचे पाहण्याचे भाग्य तिला डोळे मिटण्यापूर्वी मिळाले.

या आपल्या साध्याभोळ्या म्हाताऱ्या आजीबद्दलची आपली कृतज्ञतेची भावना फकीरमोहनांनी तिच्या स्मृतिप्रीत्यर्थ एक दीर्घ काव्य लिहून व्यक्त केली आहे. या शिवाय आपल्या अनेक कथा आणि कादंबऱ्यांमधील निरनिराळ्या व्यक्तिरेखांच्या रूपातही त्यांनी आपल्या आजीच्या स्मृती चिरंतन करून ठेवल्या आहेत.

***

—9

# थोर त्रिकूट

गेल्या शतकाच्या साठीच्या दशकामध्ये बालासोर येथे एक महत्त्वाची घटना घडली. तीन उगवते तारे, तीन बुद्धिमंत एकत्र आले आणि आजन्म मित्र झाले. त्यापैकी राधानाथ राय आणि मधुसूदन राव हे दोघे विद्यापीठामधून इंग्लिशचे उत्तम ज्ञान घेऊन बाहेर पडले होते. दोघांचेही वडील सरकारी नोकर होते आणि हे दोघेही सरकारी शिक्षण खात्यामध्ये उच्च पदावर होते. सेवानिवृत्तीनंतर त्यांना चांगली भरघोस पेन्शन मिळत होती.

या त्रिकूटातले तिसरे सदस्य आपले फकीरमोहन होते. त्यांना मात्र ना धड प्राथमिक शिक्षण मिळाले होते, ना कायमची भरवशाची नोकरी होती. आयुष्याशी सतत झगडत लढणारा तो गृहस्थ होता. पण नशिबाचे खेळ किती अगम्य असतात पहा! या तिघांपैकी जो सर्वांत कमी शिकलेला होता, ज्याच्याजवळ जवळपास नाहीच म्हणावा इतका कमी पैसा होता, ज्याला अभिमानाने सांगावा असा कुठलाही सामाजिक किंवा शैक्षणिक दर्जा नव्हता, तोच पुढच्या काळात सर्वांत जास्त पुढे आला. इतर दोघांनी कधी स्वप्नातही कल्पना केली नसेल अशी बौद्धिक अन् आध्यात्मिक पातळीवरची कामे त्याने केली.

1872 साल हे ओरिया साहित्यातले एक अतिशय वैशिष्ट्यपूर्ण साल समजले जाते. याच वर्षी राधानाथ राय आणि मधुसूदन राव यांनी 'कवितावली' या शीर्षकाचा ओरिया भाषेतील नवकाव्याचा एक संग्रह प्रकाशित केला. ब्रिटिश सरकारने आधुनिक पद्धतीच्या ज्या शाळा ओरिसामध्ये सुरू केल्या होत्या त्यातल्या विद्यार्थ्यांना अशा प्रकारच्या पुस्तकाची निकड होती. 'कविताबली'मुळे ती पूर्ण झाली. ओरिया साहित्याच्या दीर्घ परंपरेमध्ये या गीतीकाव्याने एका नवीन युगाची सुरुवात केली. इथे एक महत्त्वाची गोष्ट लक्षात येते. फकीरमोहनांच्या या दोघा उच्चविद्याविभूषित मित्रांनी या कामात त्यांचे कुठलेही साहाय्य घेतले नव्हते किंवा त्याबद्दल त्यांना विश्वासात घेऊन काही सांगितलेही नव्हते. कदाचित वयाच्या तिशीत असूनही फकीरमोहनांची गणना अद्याप नवशिक्या कवींमध्येही होत नव्हती, हे त्यामागचे कारण असावे.



पण एक गोष्ट मात्र नक्की की साहित्याच्या त्या काळातील क्षेत्रात फकीरमोहनांसारखा अनपेक्षितपणे चमकलेला अन् बुद्धीची चमक दाखविणारा दुसरा कुणीही लेखक नव्हता. व्यवहारचतुर बुद्धिवंताचा तो साक्षात् अवतार होता. एरवी मेंदूच्या तळाशी सुप्तावस्थेमध्ये दडून राहणारी त्यांची बुद्धी अनपेक्षित प्रसंगी सजग होऊन आल्या प्रसंगाला सर्वशक्तिनिशी सामोरी जात असे.

एका साध्या अर्धशिक्षित मुलामधून एक बुद्धिमान शिक्षक, भाषाशास्त्राचा पंडित, कुशल प्रशासक आणि निरपवाद लोकनेता कसा निर्माण होऊ शकतो ते आपण पाहिलेच. आता आपण याच व्यक्तीमधून 'व्यासकवी' किंवा 'मिश्र संस्कृतीचा कवी' असे सार्थ बिरुद मिरविणारा, लोकांनी हेवा करावा इतका यशस्वी ठरलेला श्रेष्ठ कवी कसा उदयाला आला ते पाहू. आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात फकीरमोहनांनी आपल्या मातृभाषेला कथा आणि कादंबऱ्यांची मोठीच देणगी दिली होती हे जरी खरे असले तरी ओरिसात मात्र ते आजही 'व्यासकवी' म्हणूनच ओळखले जातात. तसा तर साहित्याच्या प्रत्येक प्रांतातच फकीरमोहनांनी लीलया संचार केला होता. त्यांच्या याच सर्वसंचारी कामगिरीवर खूष होऊन बामरा दरबारने त्यांना 'सरस्वती' हे सन्मानचिन्ह बहाल केले होते.

1872 पर्यंतच्या दशकात फकीरमोहनांच्या नावावर फक्त दोन ओरिया गद्य पुस्तके जमा होती. एक – ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या बंगाली 'जीबन चरित्रे'चं ओरिया भाषांतर आणि दुसरे म्हणजे 'History of India' "हे पुस्तक मी तीन वर्षांच्या परिश्रमानंतर लिहिले आहे," अशी नोंद स्वत: फकीरमोहनांनी केली आहे. त्यांच्या या पुस्तकाचा समावेश वर्षानुवर्षे शाळांमधील क्रमिक पुस्तकांमध्ये केला जात असे. त्यादृष्टीने फकीरमोहनांच्या परिश्रमांचे चीज झाले असे म्हणायला हरकत नाही.

### अनुसर्जक

जवळजवळ दहा वर्षांच्या विश्रांतीनंतर सेनापतींनी पुन्हा लेखनाला सुरुवात केली. बालासोरमधले स्वस्थ आणि शांत शाळामास्तरांचे जीवन केव्हाच मागे पडले होते. सरकारी नोकरीच्या पाठी त्यांना वेगवेगळ्या ठिकाणी फिरावे लागत होते. मधला काही काळ त्यांनी बेकारीतही घालवला होता. या काळात पैशांची तीव्र चणचण त्यांनी सोसली होती. नंतर मात्र स्वप्नातही कधी कल्पना केली नव्हती इतक्या मोठ्या पगाराच्या नोकऱ्या त्यांना मिळत गेल्या.

ज्या काळात ते धेन्कानल इस्टेटचे असिस्टंट मॅनेजर म्हणून काम करत होते त्या काळात त्यांना अपत्य निधनाच्या दु:खाला सामोरे जावे लागले होते. त्यांच्या दुसऱ्या पत्नीपासून झालेला त्यांचा हा पहिलाच मुलगा होता. फकीरमोहन म्हणतात– "हा मुलगा आम्हा दोघांचाही विशेष लाडका होता. कारण एकतर तो मुलगा होता अन्

दुसरं म्हणजे तो दिसायला अतिशय सुरेख होता.'' तशी पहिल्या पत्नीपासून झालेली एक मुलगीही त्यांना होती, पण फक्त सहा महिन्यांच्या जीवनात आपल्या बाळलीलांनी या मुलाने आपल्या आईबापांना इतका लळा लावला होता की त्याचे मरण फकीरमोहनांना मोठाच चटका लावून गेले. फकीरमोहनांचे दु:ख फार मोठे होते हे खरेच, पण नुकत्याच आई झालेल्या कोवळ्या वयाच्या कृष्णाकुमारींना तर दु:खाच्या या आघाताने अगदी बधिर करून टाकले होते.

कामाच्या वेळा सोडल्या तर फकीरमोहन या काळात जास्तीत जास्त वेळ घरात राहत असत. त्यांच्या लाडक्या पत्नीच्या मनाला पहिल्यावहिल्या अपत्याच्या मृत्यूने जी भळभळती जखम झाली होती तिच्यावर फकीरमोहनांच्या हळुवार वागणुकीने मलमाचे काम केले. कृष्णाकुमारी ही मूलत:च एक अतिशय धार्मिक वृत्तीची स्त्री होती. स्वत: अशिक्षित असूनही फकीरमोहनांसारख्या देवदत्त बुद्धिमत्ता लाभलेल्या गृहस्थाला तिने जवळजवळ दोन दशके आपल्या नि:स्वार्थ सेवेची साथ दिली हे फकीरमोहनांचे भाग्यच म्हणावे लागेल. कृष्णाकुमारीच्या मनाची घडण सामान्य भारतीय स्त्रीची होती, एका धर्मपरायण स्त्रीची होती, हेच त्यामागचे गमक होते.

पिता–पुत्राच्या नात्याचे उदात्त चित्रण रामायणाशिवाय इतरत्र कुठेही सापडणे कठीण आहे. आपल्या प्रिय पुत्राला वनवासाला जाण्याची आज्ञा दिल्यानंतर दशरथाने पश्चात्तापाचे जे उष्ण अश्रू ढाळले होते, त्या अश्रूंमध्ये आजही अनेक पित्यांना आध्यात्मिक सांत्वना प्राप्त होते. कृष्णाकुमारीला झालेल्या पुत्रवियोगाच्या दु:खावर उतारा म्हणून फकीरमोहनांनी आपल्या घरात दररोज एका ब्राह्मणाकरवी बालारामदासाच्या रामायणाचा पाठ सुरू केला. पण ब्राह्मणदेव इतक्या घाईघाईने अन् तालासुरात हे रामायण वाचत असे किंवा गात असे म्हणा की बिचाऱ्या कृष्णाकुमारीच्या मनापर्यंत त्यातला अर्थ फार क्वचित पोचत असे. हे लक्षात येताच फकीरमोहनांनी तो प्रकार बंद केला, आणि स्वत:च रोज वाल्मीकी रामायणाच्या काही भागांचे ओरिया भाषेत भाषांतर करून तो भाग संध्याकाळी पत्नीला वाचून दाखविण्याचा परिपाठ चालू केला. याचा अतिशय चांगला परिणाम दिसून आला. फकीरमोहनांची भाषा अतिशय प्रवाही आणि अर्थ स्वच्छपणे पोहोचवणारी होती. त्यामुळे कृष्णाकुमारीसारख्या अशिक्षित स्त्रीलाही तो अर्थ समजत असे. आधुनिक भारतीय साहित्यात पहिल्यांदा जनसामान्यांचा शब्द उमटवणारे फकीरमोहन असावेत अन् त्यांच्या या लेखनाचा पहिला श्रोता अन् टीकाकार त्यांची साधीभोळी अशिक्षित पत्नी असावी, हा योग खरोखर अपूर्व होता.

रामायणातील सर्गामागून सर्ग फकीरमोहनांच्या तोंडून बाहेर पडत गेले अन् कृष्णाकुमारी आपल्या पतीच्या मुखातून बाहेर पडणारा शब्दन्‌शब्द कर्णसंपुटात साठवू लागली. राम वनवासात जातो त्या प्रसंगी तर तिच्या डोळ्यांना अश्रूंची जी धार लागली होती ती थांबता थांबेना. नंतर काही काळाने फकीरमोहनांचे रामायणावरील हे



पुस्तक छापले गेले. फकीरमोहन या प्रसंगाबद्दल लिहितात – ''कृष्णाकुमारीने अश्रूभरल्या नयनांनी रामायणाची ती प्रत आपल्या हाती धरली अन् गदगदलेल्या स्वरात ती मला म्हणाली, 'पुत्र गेल्याचे दु:ख आपण आता कशाला करायचे? लोकांना अपत्य हवे असते ते आपले नाव जगात कायम ठेवायलाच ना? पण असे नाव किती काळ पुढे चालू शकते? फार थोडा काळ. पण तुमचे हे रामायण, आपले हे अपत्य आपले नाव कायमचे जागते ठेवेल याची मला खात्री आहे.''

पत्नीच्या या बोलण्याने फकीरमोहनांचा उत्साह वाढला आणि त्यांनी लवकरच संपूर्ण रामायणाचे ओरिया भाषांतर सिद्ध केले. तिच्याच आग्रहाखातर त्यांनी महाभारताचे भाषांतर करायलाही लगेचच सुरुवात केली. प्रचंड परिश्रमानंतर गेल्या शतकाच्या शेवटी शेवटी त्यांनी हे काम तडीला नेले.

फकीरमोहनांच्या या रामायण आणि महाभारताला ओरिसाच्या कानाकोपऱ्यातून प्रचंड लोकप्रियता मिळाली. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे फकीरमोहनांचे रचनाकौशल्य! या पूर्वी ओरिया भाषेत रामायण आणि महाभारताची अनेक भाषांतरे झाली होती, पण त्यांच्यापैकी एकही भाषांतर इतके सुबोध, विश्वासार्ह आणि प्रासादिक नव्हते. फकीरमोहनांच्या या कलाकृतींनी केवळ त्यांच्या पत्नीच्या दु:खी मनाला दिलासा दिला, तिचे दु:ख कमी केले असे नाही, तर संपूर्ण देशालाच एक अनोखा लाभ करून दिला.

लोकांची आध्यात्मिक तहान भागवणारी उपनिषदे ओरिया भाषेत उपलब्ध नाहीत हे फकीरमोहनांच्या लक्षात आले आणि त्यांनी सर्व महत्त्वाच्या उपनिषदांचे ओरिया भाषेत काव्यरूपात भाषांतर करायला सुरुवात केली. आजवर कुणीही हे धाडस केले नव्हते. वेदांमधील अतिगहन ऋचांचे फकीरमोहनांनी केलेले हे भाषांतर इतके रसाळ अन् प्रासादिक आहे की, आजच्या भाषेत त्याचे वर्णन 'अनुवाद' (Translation) असे न करता 'अनुसर्जन' (Transcreation) असे करता येईल.

मुळात एकाच व्यक्तीने रामायण, महाभारत आणि महत्त्वाची उपनिषदे भाषांतरित करणे हीच आश्चर्याची बाब आहे. अन् हे काम करणारी व्यक्ती एक मुलकी अधिकारी, प्रशासकीय कार्यात विरोधी शक्तींच्या मुकाबल्यात उभी राहणारी, फकीरमोहनांसारखी असाधारण, कार्यव्यग्र व्यक्ती आहे हे समजल्यावर तर आपण आश्चर्यचकित होऊन जातो. कुठलेतरी झपाटलेपण असल्याशिवाय कुणीही इतके प्रचंड शारीरिक आणि मानसिक परिश्रम करू शकत नाही. फकीरमोहन असेच झपाटलेले होते. त्यांच्याइतका व्यासंगपूर्ण भाषांतर करणारा दुसरा कोणताही लेखक ओरिया भाषेत, साहित्यात आढळून येत नाही, तो याचमुळे! आपली मायभाषा समृद्ध करावी ही सुप्त प्रेरणाही या सर्व कार्यामागे असावी.

## पहिली सृजनात्मक कलाकृती

'उत्कलभ्रमणम्' (ओरिसातील भ्रमंती) ही फकीरमोहनांची पहिली स्वतंत्र कलाकृती होती. मळलेली पाऊलवाट सोडून वेगळी वाट चोखाळण्याची त्यांची जिद्द आणि उमेद त्यांच्या या कलाकृतीत दिसून येते. आपले भाषांतर प्रसिद्ध करत असण्याच्या काळातच त्यांनी ही कलाकृती लिहिली होती. मागे ज्या भूयन्स लोकांच्या बंडाचा उल्लेख आला आहे त्या प्रकरणातून ते नुकतेच बाहेर पडले होते. त्या बंडाच्या संदर्भात जे ब्रिटिश अधिकारी केन्दुझारला आले होते, त्यांना जवळच्या भद्रक या रेल्वे स्टेशनवर सोडून फकीरमोहन मुख्यालयाकडे परत येत होते. हत्तीवर स्वार होऊन आनंदपूरला येता येता त्यांच्या मनात एक कल्पना चमकून गेली. 'समकालीन ख्यातकीर्त ओरिया व्यक्तींची चरित्रे काव्यात गुंफायला काय हरकत आहे?' मनातली कल्पना त्यांनी लगेच प्रत्यक्षात आणली. खिशातून कागद–पेन्सिल काढली आणि त्या हलत्याडुलत्या अंबारीत बसून ते कविता लिहू लागले. आनंदपूरला पोहोचेपर्यंत त्यांचा अर्धा ग्रंथ लिहूनही झाला होता; अन् तिसऱ्या दिवशी तो प्रेसला छापायलाही गेला होता.

त्यांचे हे उपहासात्मक काव्य आजही ओरिया साहित्यात अजोड समजले जाते. आजवर असे काव्य कुणी करू शकलेले नाही. फकीरमोहन हे एकटेच असे कवी निघाले की, ज्यांनी हे काव्यात्म सामाजिक–राजकीय धाडस केले. आमच्या माहितीप्रमाणे या काव्याच्या जवळपास येऊ शकेल असे काव्य बंगालीत आणि हिंदीतही निर्माण झालेले नाही. थोडक्यात काय तर सेनापतींचे 'उत्कलभ्रमणम्' हे आजवरचे एकमेवाद्वितीय काव्य समजले जाते.

या ग्रंथाने ओरिसात मात्र प्रचंड खळबळ उडवून दिली. तळहातावरील रेषांइतक्या स्पष्ट रूपातील त्यातील व्यक्तिचित्रणांमुळे, त्यातील उपहासात्मक भाषाशैलीने अन् वक्रोक्तीने वाचकांना मनमुराद हसवले. जगन्नाथाच्या देवळात भक्तांना घेरणाऱ्या अशिक्षित पंड्यांच्या आणि ब्राह्मणांच्या निर्लज्ज व्यवहारावर त्यांनी कठोरपणे कोरडे ओढले आहेत. तसेच शब्दांचे फटकारे त्यांनी नवीन नवीन इंग्रजी शिकून स्वत:ला बाबू समजणाऱ्या नवशिक्या तरुण वर्गावरही ओढले आहेत. या तरुणांना आपली भाषा, आपली संस्कृती यांची टिंगल करणे आणि स्वत:ला इंग्लिशमन म्हणवून घेण्याची केविलवाणी धडपड करणे यात धन्यता वाटत असे. पण असे करण्यात ते भारतीय म्हणवून घेण्याच्याही लायकीचे राहत नसत. फकीरमोहनांनी या तरुणवर्गाला आपल्या तिखट तिरंदाजीचे लक्ष्य केले होते. त्यांनी लिहिले होते की – ''जेव्हा जेव्हा माझ्या नजरेला हे तथाकथित शिक्षित बाबूलोक पडतात तेव्हा तेव्हा 'माणसाची उत्क्रांती माकडापासून झाली' हा सिद्धान्त डार्विनला यांच्याकडे पाहूनच सुचला असावा असे मला वाटते.'' हे लोक इंग्रजीविषयी बाळगत असलेला वृथा अभिमान



अन् आपल्या भाषेला मात्र तुच्छ लेखण्याची त्यांची वृत्ती पाहून ते लिहितात – ''बरोबर आहे! लोकांनी गटारात फेकलेल्या उष्ट्या पत्रावळी चाटून जर कुत्र्यांचे पोट भरत असेल तर त्यांना स्वत:चे घर असावे असे कशाला वाटेल?''

1894 साली, म्हणजे 'उत्कलभ्रमणम्' या उपहासगर्भ आणि सनसनाटी पुस्तकाच्या प्रकाशनानंतर दोनच वर्षांनी दुर्दैवाने कृष्णाकुमारी हे जग सोडून गेली. तिच्या जाण्याने त्यांचे हृदय शतश: विदीर्ण झाले होते. फकीरमोहन अगदी एकटे अन् असहाय झाले होते. या दु:खाने त्यांच्यातील हलकेफुलके/विडंबनात्मक लिहिणारा कवी, अनुवादक जणू नाहीसा झाला आणि त्याच्या जागी एका बहुआयामी निर्मितीक्षम कवीचा जन्म झाला. स्वत:च्या व्यक्तिमत्त्वात झालेल्या या बदलाबद्दल फकीरमोहन लिहितात – कविता करण्याचा हा गुण मला माझ्या पत्नीने दिलेली देणगी म्हणावी लागेल. माझ्या कविता ऐकण्याची तिला खूप आवड होती. तिची ही आवड पूर्ण करावी म्हणून मी ''कविता करायला सुरुवात केली. ती गेल्यानंतर आता मी माझ्या दु:खाला वाट करून द्यायला कविता करणे चालू ठेवले आहे. कृष्णाकुमारी असताना ती रोज सकाळी स्नान होताच माझ्या रामायणातला आणि महाभारतातला काही भाग नियमितपणे वाचत असे. तिच्या मृत्यूनंतरच्या माझ्या कविता हा माझ्या गंभीर मानसिक परिस्थितीचा, व्यक्तिगत आघाताचा उद्रेक म्हणता येईल; किंवा सखीच्या वियोगाच्या दु:खद विळख्यातून बाहेर पडण्याची ती धडपड म्हणता येईल.''

## उदात्ततेचा झळाळ

मनाच्या अशा स्थितीत फकीरमोहनांनी वेगवेगळ्या विषयांवर लिहिलेल्या कवितांची संख्या चकित करणारी आहे. पुढच्या काळात त्यांनी अनेक कथा–कादंबऱ्या लिहिल्या, या कथा-कादंबऱ्यांनी त्यांना ओरिया साहित्यातल्या एकमेवाद्वितीय लेखकाचे स्थान मिळवून दिले हे सर्व जरी खरे असले तरी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सर्व पैलू आपल्या संपूर्ण सामर्थ्यानिशी त्यांच्या कवितांमधूनच प्रकट होताना दिसतात. वरवर असंबद्ध वाटणाऱ्या या असंख्य कलाकृतींमधून आपल्या समोर येते ते एक आश्चर्य वाटण्याजोगे सर्वस्पर्शी मन! असे मन, जे कुठल्याही श्रेष्ठतेविषयी किंवा उदात्ततेविषयी अतिशय आत्मीयतेने विचार करू शकते! या त्यांच्या उदात्त विचारांचे द्योतक म्हणून त्यांच्या 'स्वर्गाच्या द्वारावर आत्मे' या कवितेचा निर्देश करता येईल. ती कविता अशी –

''स्वर्गात प्रवेश करण्यापूर्वी प्रत्येक आत्म्याला तेथील द्वारावर उभ्या असलेल्या रखवालदाराला आपण आपल्या आयुष्यात मानव जातीच्या भल्यासाठी काय केले आहे याचा पुरावा/दाखला द्यावा लागतो. विशिष्ट जात, जमात, धर्म, पंथ, त्याच्या कर्मकांडाचे अंधानुकरण यापेक्षाही हा दाखला अधिक महत्त्वाचा असतो. अशा एका रखवालदारासमोर एक अतिशय पवित्र समजला जाणारा मुस्लीम आत्मा उभा राहतो.

त्याने आयुष्यभर पाच वेळचा नमाज कधीही चुकवला नसतो, रमजानच्या महिन्यात कडक रोजे पाळले असतात आणि आपल्या सगळ्या निष्ठा त्याने फक्त मोहम्मदावर केंद्रित केलेल्या असतात. ''म्हणजे तू कधीच मोझेस, बुद्ध, ख्रिस्त किंवा इतर कुणाही देवाच्या दूतासमोर झुकला नाहीस?'' त्या रखवालदाराने विचारले. ''ते कसे शक्य होते?'' त्या सनातनी मुसलमानाने विचारले. ''ते सगळे काफीर आहेत.'' यावर तो रखवालदार त्याला निर्णायक सुरात सांगतो – ''तुझ्यासारख्यांना देवाच्या या राज्यात प्रवेश नाही.''

नंतर येतो एक तितकाच सनातनी रूढीप्रिय हिंदू-वैष्णव! मोठ्या प्रौढीने तो आपल्या गळ्यातल्या तुळशीच्या माळेवर हात फिरवत असतो अन् तोंडाने अखंड भगवंताचा नामजप करत असतो. पण तो रखवालदार त्याला सांगतो – ''तुमचे मुंडन केलेले शीर, तुळशीमाळ घातलेला गळा आणि शालीने अवगुंठित केलेले शरीर खाली पृथ्वीवरच जळून गेले आहे. पृथ्वीवर असताना तुम्ही बुद्ध, जिझस किंवा मोहम्मद या देवाच्या इतर दूतांकडे कधीच लक्ष दिलं नाहीत. तुमच्यासारख्याला देवाच्या राज्यात प्रवेश नाही.''

इतर धर्मांच्या अनुयायांशीही अशाच प्रकारची प्रश्नोत्तरे होतात. एकही आत्मा रखवालदाराच्या कसोटीला उतरत नाही. सरतेशेवटी रखवालदार त्यांना पृथ्वीवरील धर्मामागची उदात्त तत्त्वे समजावून सांगतो. तो म्हणतो, ''मानवाला माणुसकीची उदात्त तत्त्वे शिकवण्यासाठीच देवाने आपले वेगवेगळे दूत पृथ्वीवर पाठवले आहेत. बुद्ध तर्कनिष्ठा आणि अलिप्तता शिकवतो, तर जिझस प्रेम आणि मोहम्मद श्रद्धा! हे तिघेही देवाचेच दूत आहेत. त्यामुळे सगळ्या लोकांनी त्यांचा सारखाच मान ठेवला पाहिजे. ज्याच्या ठायी प्रेम, श्रद्धा, भक्ती आणि विरक्ती हे चारही गुण असतील तोच आत्मा देवाच्या या राज्यात प्रवेश करू शकेल. केवळ कर्मकांडात गुंतून पडलेल्या किंवा एकमेकांच्या धर्माचा द्वेष करणाऱ्या आत्म्याला इथे प्रवेश मिळू शकणार नाही. स्वत: माणूस असूनही जो माणसाला आपल्यापेक्षा वेगळा समजतो आणि वागवतो तो मेल्यानंतर स्वर्गाचा नव्हे तर नरकाचा धनी होतो.

## वैश्विक दृष्टिकोण

राधानाथ आणि मधुसूदन हे फकीरमोहनांचे सुशिक्षित कवी-मित्र सदैव फक्त काव्यशास्त्रीय विषयांवर, प्रश्नांवर लिहीत असत. जेमतेम शाळेचे तोंड पाहिलेल्या फकीरमोहनांच्या प्रज्ञेला मात्र असे कुठलेच बौद्धिक बंध नव्हते. त्यांनी काव्याचे ग्रांथिक शिक्षण घेतले नव्हते. त्यांच्या मनात जे विचार, ज्या कल्पना आल्या त्या जशाच्या तशा आपल्या लोकांपर्यंत पोहोचविण्याचा त्यांनी सहज प्रयत्न केला. ही क्रिया अगदी साधी, सरळ, स्फटिकासमान स्वच्छ होती. विद्वत्तेचा आव, परिणामांचा इतकासाही



विचार त्यामागे नव्हता. आपल्या आजूबाजूला घडणाऱ्या घटनांबद्दल आपल्याला काय वाटते ते तत्परतेने आपल्या वाचकांसमोर कसे पोहोचविता येईल एवढाच विचार फकीरमोहनांच्या मनात असे. सर्वसामान्य माणसांजवळ आपले मत स्पष्टपणे मांडण्याचा धीटपणा नसतो. फकीरमोहन याला अपवाद होते. सत्य, न्याय आणि वास्तव यासाठी ते कुणाला आवडेल, न आवडेल याची पर्वा न करता आपली भूमिका ठामपणे मांडत असत. कुठलाही विषय त्यांना त्यामुळे वर्ज्य नव्हता. 'एका कवीचा सूडकरी साथीदार'पासून ते 'घटस्फोटित जोसेफाईनचे अश्रू'पर्यंत आणि 'भारतीय जनतेची वेदना'पासून ते थेट 'तरुण हिंदू विधवा'पर्यंत सर्व प्रकारचे विषय त्यांनी आपल्या काव्यातून हाताळले होते. जपानच्या वैभवाचे आणि हे वैभव प्राप्त करण्यासाठी जपान्यांनी केलेल्या परिश्रमांचे त्यांनी आपल्या अनेक कवितांमधून मुक्तपणे कौतुक अन् स्वागत केले आहे. आपल्या लोकांनी त्यांच्यापासून काही बोध घ्यावा हा हेतूच या लिखाणामागे होता. जपानहून आयात केलेल्या सुकुमार सुगंध असलेल्या 'हुस्न-हीना' वर त्यांनी एक तितकेच तरल काव्य लिहिले आहे. उगवत्या सूर्याच्या या देशाबद्दल, तिथल्या संस्कृतीबद्दल, शिस्तीबद्दल आणि जपानी लोकांच्या सौंदर्यदृष्टीबद्दल त्यांना एकूणच विलक्षण ओढ होती, आत्मीयता होती. ही ओढ इतकी प्रबळ होती की उतारवयात देखील फकीरमोहन जपानवारी करण्याचे मनसुबे रचत असत. एकनिष्ठ रोमन स्त्री ल्युक्रेशिया हिच्यावर त्यांनी एक दीर्घकाव्य लिहिले होते. अशा गुणवंत स्त्रिया फक्त भारतातच आढळू शकतात अशी जी लाडकी समजूत आम्हा भारतीयांच्या मनात ठामपणे मूळ धरून होती तिला धक्का देण्यासाठी, ती किती तकलादू आहे हे दाखविण्यासाठीच बहुधा फकीरमोहनांनी हा विषय निवडला असावा. अशीच एक कविता त्यांनी क्लिओपात्रावरही लिहिली होती. या दोन हरिणाक्षींच्या फसव्या नजरांनी दोन महापराक्रमी योद्ध्यांवर अशी काही जादू केली की एकेकाळी अजिंक्य समजल्या जाणाऱ्या टोलेमीस आणि टारक्वाईन्सचा प्रभाव हां-हां म्हणता नाहीसा झाला, हे ऐतिहासिक सत्य फकीरमोहनांनी या दोघींवरील कवितेतून अधोरेखित केलेले आहे. अशाच काही कविता त्यांनी कृष्णावर, जिझस ख्राईस्टवर आणि तुकारामांवरही लिहिल्या आहेत. 'एक मृत पलाशवृक्ष', 'कबुतरांची प्रणयी जोडी' आणि 'जमिनीवर गळून पडण्यापूर्वीचे एका मृत पर्णाचे शेवटचे मनोगत' या फकीरमोहनांच्या आणखी काही उल्लेखनीय कविता आहेत.

## सामान्य स्त्रीविषयीची अनुकंपा

फकीरमोहनांच्या बहुरंगी काव्यजगतात महाकाव्ये आहेत, उपनिषदे आहेत, असंख्य गीते आहेत आणि सर्व प्रकारच्या विषयांवरची विडंबने आहेत. पण या सर्व गर्दीमध्ये त्यांनी आपल्या आजीबद्दल आणि पत्नीबद्दल लिहिलेल्या कविता वाचकांना

आकर्षून घेतात, सर्वाधिक भावतात. कारण त्या आसूभिजल्या शब्दांमधून आपल्याला जाणवतो तो पत्नीच्या विरहाने, शोकाने विदीर्ण झालेल्या फकीरमोहनांच्या आत्म्याचा हुंकार!

आपली पत्नी कृष्णाकुमारी हिच्या स्मृतीला त्यांनी अर्पण केलेली शब्दरूप 'पुष्पमाला' ही जगातील प्रत्येक प्रेम करणाऱ्या व्यक्तीच्या मनातील उदात्त प्रेमभावनेला हात घालणारी, चेतवणारी कविता आहे. त्यातील काही ओळी अशा –

प्रिये कृष्णाकुमारी, माझ्या कुटीराच्या राणी
माझ्या शाश्वत प्रेमाच्या धनी, जीवनापेक्षा प्रिय सखी
माझ्या शाश्वत सहचारिणी, माझ्या प्राणेश्वरी
तू गेल्यावर बघ – कसे सर्व गुण तुझे
तुझ्या आठवातून, माझ्या श्वासात
माझ्या स्वप्नात मिसळून गेले आहेत –
तुजपेक्षा गुणवान पत्नी, तुज इतकी एकनिष्ठ
समर्पित स्त्री, मी अद्याप न देखिली न ऐकिली!
प्रिये, निळ्या आकाशात तरंगणाऱ्या चंद्रबिंबाची मोहकता
अथवा उत्फुल्ल कमलपाकळ्यांवर किंवा गुलाबपुष्पांवर
ओथंबलेले दवाचे मोतिबिंदू, क्षुद्र वाटतात –
तुझ्या नेत्रातून ओघळणाऱ्या अश्रूंपुढे
जेव्हा तू साधत असतेस परमेश्वराशी संवाद
तुझ्या देखण्या चेहऱ्याची प्रभा पसरली वाटते
मला या संपूर्ण आकाशावर
आठवते तुला
नि:स्तब्ध असताना जग सारे
फक्त तू अन् मी बसत असू
आपल्या गच्चीत किंवा दारापुढल्या फुलत्या बागेत
अन् बघत असू लक्षावधी चांदण्या
चमकणाऱ्या आणि आकाशात संथपणे
तरंगणारा चंद्र
सभोवताली पसरलेला स्वर्गीय प्रकाश
मला वाटायचे त्यावेळी प्रिये, त्या शांत
जादूभरल्या क्षणांमध्ये की
आपण दोघेही आहोत तारेच जुळे
वर चमकणाऱ्या ताऱ्यांसारखे —



'ती हसत निघून गेली, मला अश्रूंच्या सागरात लोटून', 'पुन्हा तो हसरा चेहरा दिसेल मला?' आणि 'कुणी सांगेल का मला, माझी प्रिय सखी कुठे गेली?' या कवितादेखील अशाच भावनांनी ओथंबलेल्या, पीडित आत्म्याच्या गाभ्यातून उमललेल्या कविता आहेत. फकीरमोहनांसारखा पत्निप्रेमाच्या उदात्त भावनेशी एकरूप झालेला पतीच आपल्या प्रियसखीच्या चरणी अशी काव्यांजली वाहू शकतो.

## बुद्धावरील महाकाव्य

फकीरमोहनांसारखा वास्तववादी विचारसरणीचा गृहस्थ बुद्धाकडे आकृष्ट झाला नसता तरच नवल होते. ओरिया साहित्यात त्यांनी जे अनेक नवीन प्रकार 'प्रथम' सुरू केले त्यातला एक म्हणजे त्यांचे बुद्धावरचे महाकाव्य! बुद्धावरचा पहिला उत्तम ओरिया काव्यग्रंथ. बुद्धाचे जीवन आणि त्याचा उदात्त विचारप्रवास यांचे दर्शन त्यांनी या महाकाव्यात घडवले आहे. यातही विशेष उल्लेखनीय आहे ती त्यांनी या काव्याला लिहिलेली अतिशय चिकित्सक आणि अभ्यासपूर्ण अशी प्रस्तावना. आज पन्नासपेक्षा अधिक वर्षांचा काळ उलटून गेल्यानंतरही त्यातले विचार बाद झालेले किंवा जुनाट झालेले वाटत नाहीत. त्यांचे हे 'बुद्धावतार काव्य' अश्वघोषाच्या गाजलेल्या 'बुद्धचरिता'प्रमाणे किंवा कुणा निनावी कवीच्या 'ललितविस्तर'प्रमाणे अथवा सर एडविन अर्नाल्ड यांच्या विश्वविख्यात 'Light of Asia'प्रमाणे मौलिक स्वरूपाचे नसले तरी बहुसंख्य ओरिया काव्यांप्रमाणे ते मिथक आणि काव्य यांची गुंफण असलेले, विविधवृत्तांमध्ये निबद्ध असलेले, एका मोठ्या ऐतिहासिक व्यक्तित्वाची उकल करणारे, त्यातून आपली आयुष्याकडे आणि धर्माकडे पाहण्याची वास्तववादी दृष्टी प्रकट करणारे काव्य आहे. ओरिया साहित्यात एक अनोखी, नवी पायवाट या ग्रंथाने निर्माण केली असे म्हणणे मुळीच वावगे ठरणार नाही.

## छळवादी पत्नी

त्यांच्या काव्याचा परिचय करून घेत असताना त्यांच्या 'कवीची छळवादी पत्नी' या काव्यात आढळणाऱ्या काही ठळक वैशिष्ट्यांचा, इतर काही गोष्टींचा परिचय सरतेशेवटी करून घेऊ या. सर्व देशातील, सर्व काळातील गरीब बिचाऱ्या सरस्वतीपुत्रांना खाष्ट पत्नीवर्गाकडून जो छळ, जी आत्मिक पीडा सहन करावी लागली आहे तिचे आणि या पत्नीवर्गाच्या सदैव असमाधानी असणाऱ्या दु:खी मनांचे चित्र त्यांनी या काव्यात केले आहे. कवीची पत्नी कवीला म्हणते – "अहो, आपल्या घराला काय अवकळा आली आहे हे दिसत नाही का तुम्हाला? उघड्या डोळ्यांनी घराची अशी दशा तुम्हाला पाहावते तरी कशी? मी दिवसरात्र तुमच्या कानीकपाळी ओरडत असते, तुमच्या विनवण्या करते, पण तुम्ही काहीच कानावर पडत नसल्यासारखे सतत ती वृत्ते, मात्रा, शब्द अन् नाद गुंफण्यात गुंग असता. काय कामाचे आहेत हो तुमचे ते

शब्द अन् त्या मात्रा? त्या जमा करून चार फुटक्या कवड्या तरी मिळतात का? चूल पेटते का त्यांनी? मी रात्रंदिवस सांगूनही तुम्ही ते शब्दांचे चमत्कार घडवण्याचे खूळ अजूनही का सोडत नाही? अहो, जरा आजूबाजूला पहा आपल्या. लोक बघा कसे काय काय करून पैसा मिळवतात, चांगलेचुंगले खातात, कपडालत्ता घेतात, मजा करतात. तुम्हाला खरेच काही समजत नाही, का तुम्ही मुद्दाम न समजण्याचे सोंग घेता हो? तुमच्या या वागण्याचा, या 'ट' ला 'ट' अन् 'री' ला 'री' जुळविण्याच्या उद्योगाचा मला अगदी कंटाळा आला आहे. तुमच्या या छांदिष्टपणाबद्दल मी कितीतरी वेळा बोललेय, पण तुम्ही आहात की काहीएक ऐकत नाही. अहो, काल ते घेणेकरी आले होते. माझ्या तोंडावर शेवटचे बजावून गेले. अजूनही तुम्ही ढीम्म कसे बसू शकता, तेच मला कळत नाही.''

***

# 10

## गोष्टीवेल्हाळाला जाग येते!

फकीरमोहन ओरिया साहित्यातील ललित गद्याचे जनक समजले जातात. पण आश्चर्याची बाब म्हणजे त्यांनी वयाची पन्नाशी पार करेपर्यंत त्यांच्यातील या क्षमतेची साधी झलकही कुणाच्या प्रत्ययाला आली नव्हती. कारण सुरुवातीला दीर्घकाळ ते कवितेतूनच संवाद साधत होते. त्यांनी गद्य किंवा इतर ललित साहित्य अगदीच लिहिले नव्हते असे नाही. साधे शाळा मास्तर असताना त्यांनी एक प्रिंटिंग प्रेस सुरू केला होता आणि एक जर्नलही ते प्रकाशित करत असत. आपल्या सुधारणावादी विचारांचा प्रचार, राष्ट्रहितविरोधी गोष्टींविरुद्ध आवाज उठवणे ही कामे त्यांनी या जर्नलमधून चालवली होती.

त्या काळी बंगाली नियतकालिकांमध्ये 'कथा' हा प्रकार फार लोकप्रिय होता. फकीरमोहनांच्या चाणाक्ष नजरेने हे टिपले आणि गतशतकाच्या साठीच्या दशकात त्यांनी आपल्या 'बोधदायिनी' नावाच्या साहित्यिक मासिकात 'लछमनिया' या शीर्षकाची कथा प्रकाशित केली. त्या काळातली बहुधा ती पहिलीच आधुनिक कथा असावी. दुर्दैवाने आज ती कथा उपलब्ध नाही.

1871 ते 1896 ही पंचवीस वर्षे फकीरमोहन एकतर प्रशासकीय ऑफिसर म्हणून कार्यमग्न होते किंवा बेकारीमुळे आर्थिक विवंचनेने घेरले गेलेले होते. दुर्दैवाने बरीच वर्षे ते आजारीही होते. बालासोरचे संकुचित क्षेत्र सोडून नव्या विस्तीर्ण प्रदेशात पाऊल ठेवण्यापूर्वीच फकीरमोहनांनी मोठ्या धाडसाने उभ्या केलेल्या सेनापती प्रेसचा गाशा गुंडाळला गेला होता. त्यांनी सुरू केलेली जर्नल्सही इतरांच्या ताब्यात गेली होती अन् त्या लोकांना ती फार काळ चालवता आली नव्हती.

बालासोर सोडल्यावर त्यांनी प्रसंगोपात्त घटनांनी किंवा परिस्थितीने प्रेरित होऊन ढिगांनी कविता लिहिल्या. पण दुसरी 'लछमनिया' मात्र लिहिली गेली नाही.

प्रशासकीय नोकरीच्या थकविणाऱ्या बंधनांमधून मुक्त होऊन कटक येथल्या आपल्या मॉडर्न, बागबगीच्या असलेल्या घरी फकीरमोहन स्थिरावले. ओरिया साहित्यातील 'त्रिमूर्ती' म्हणून प्रसिद्ध असलेल्या राधानाथ, मधुसूदन आणि फकीरमोहन यांच्याबद्दल

नितांत आदर बाळगणारे त्यांचे मित्र विश्वनाथ कार यांनी त्याच सुमाराला 'उत्कलसाहित्य' नावाचे एक मासिक कटकहून प्रकाशित करायला सुरुवात केली होती. आपल्या मासिकातला साहित्यगुच्छ अधिक देखणा अन् आकर्षक करावा या हेतूने त्यांनी सर्व थरांमधून सर्व प्रकारच्या कथा मागवायला सुरुवात केली. फकीरमोहनांनाही त्यांनी कथा लिहिण्याचा आग्रह केला, अन् कसा कोण जाणे पण फकीरमोहनांमधील निद्रिस्त कथाकार या संधीने जागा झाला.

त्यानंतर मात्र अगदी आपल्या शेवटच्या श्वासापर्यंत, म्हणजे 1918 पर्यंत त्यांनी आपल्या लेखणीतून असंख्य कथा, कादंबऱ्या प्रसृत केल्या. उतारवयातील त्यांचा हा जोम एखाद्या ऐन भरातील तरुण लेखकाला लाजवणारा होता. निवृत्तीनंतरचा काळ हा साधारणपणे घरच्यांकडून सेवा करून घेण्याचा काळ असतो. पण या काळात फकीरमोहनांच्या नशिबी घरातला असह्य असा छळवाद सुरू होता. अशा परिस्थितीमध्ये आणि वयामध्ये त्यांनी 'ओरिया साहित्यात एकमेव' असे स्थान मिळविणाऱ्या कथा लिहिल्या हे मोठे नवलाचे वाटते. त्यांचे सर्व मित्र आणि सहकारी कटकला राहत होते. पण फकीरमोहनांचे दुर्दैव असे की, त्यांना आपल्या या मित्रांचा बौद्धिक सहवासदेखील फार काळ लाभला नाही. मुलगा आणि सून यांचे आगमन घरात झाले आणि या पितामहांना त्यांनी मोठ्या हौसेने बांधलेले, बागबगीचा असलेले घर सोडून बालासोर येथे जावे लागले. नशीब बरे की त्यांनी आधीच एक ऐसपैस घर तेथे बांधून ठेवले होते! याच घरात राहून एकाकी अवस्थेतला आपला वेळ त्यांनी अति उत्तम अशा कविता आणि कादंबऱ्या लिहिण्यात घालवला. कटक आणि बालासोर येथल्या दोन्ही वास्तू या दृष्टीने अतिशय भाग्यवान ठरल्या. महत्त्वाची गोष्ट म्हणजे या साऱ्या कथा–कादंबऱ्या त्यांनी त्या काळात ओरिसात सर्वाधिक महत्त्वाच्या समजल्या जाणाऱ्या 'उत्कल साहित्य' आणि 'मुकुर' या दोन मासिकांसाठी, त्यांच्या संपादकांच्या खास मागणीवरून लिहिल्या होत्या.

## लोकांच्या भाषेत लिहिणारा लेखक

ज्या काळात फकीरमोहनांनी ललितरम्य गद्य लिहायला सुरुवात केली, त्या काळात एकेकाळी लोकप्रियतेच्या शिखरावर तळपत असलेल्या जुन्या लेखकांची पिढी हळूहळू अस्तंगत होऊ लागली होती. पिआरी चंद्र, मित्रा, अक्षयकुमार दत्ता, ईश्वरचंद्र विद्यासागर, भूदेव मुकर्जी आणि बंकिमचंद्र हे लेखक जग सोडून गेले होते. फकीरमोहन या सगळ्या लेखकांचे चाहते होते; त्यांचा त्यांच्याशी चांगला परिचय होता. पण या अर्धशिक्षित लेखकाचे वैशिष्ट्य असे की, त्यांच्या गद्य साहित्यावर यांच्यापैकी एकाच्याही लेखनशैलीची छाप नाही. त्यांच्या सर्वपरिचित लेखनमार्गापेक्षा अगदी वेगळा, स्वत:चा ठसा असलेला राजमार्ग फकीरमोहनांनी चोखाळला. आशय, शैली आणि आविष्कार या तिन्ही बाबतीतील आपले स्वत:चे वेगळेपण त्यांनी सिद्ध करून दाखवले.



कलकत्त्याला तेव्हा नुकतेच विद्यापीठ सुरू झाले होते. तिथून पौर्वात्य आणि पाश्चिमात्य अशा दोन्ही प्रकारचे आधुनिक ज्ञान घेऊन बाहेर पडलेली बंगाली नवतरुणांची पिढी त्या वेळी साहित्याच्या क्षेत्रात वावरू लागली होती. उलट फकीरमोहनांना शाळेचा, तोही फक्त दोन वर्षे प्राथमिक शिक्षणाचा अनुभव होता. पण ते सच्चे मानवतावादी लेखक होते. त्यामुळे त्यांच्या लेखनातून ते नवनवीन कल्पनांचा खुल्या मनाने स्वीकार करत असत आणि समाजाला बांडगुळाप्रमाणे चिकटवून त्याचे शोषण करणाऱ्या केवळ परंपरेने ब्राह्मणत्व लाभले म्हणून स्वत:ला उच्च समजणाऱ्या पण खरे तर अज्ञानी/निर्बुद्ध असणाऱ्या उच्चवर्णीयांवर कोरडे ओढत असत. भारतीय समाजातील सडलेल्या, टाकाऊ चालीरीतींवर देखील ते तितकेच कठोर प्रहार करीत असत. सामान्य माणूस हाच भारतीय राष्ट्राचा कणा आहे हे ओळखून त्याच्या स्थितीमध्ये सुधारणा घडवून आणणे म्हणजेच राष्ट्रात सुधारणा घडवून आणणे, असे त्यांचे मत होते. अशा जनतेसाठी आणि विशेषकरून स्त्रियांना समान हक्क मिळावेत या आपल्या मताच्या पुरस्कारासाठी त्यांनी सतत आपली लेखणी झिजवली. पुढच्या काळात भारतीय राजकारणी लोक आणि लेखक हे सामान्य लोकांबद्दल ज्या ढोंगी, खोट्या कळवळ्याच्या भाषेत बोलू आणि लिहू लागले, ती भाषा ओरिसातील फकीरमोहन नावाच्या या द्रष्ट्या लेखकाने पन्नास वर्षे आधीच ओळखली होती. म्हणूनच सामान्य लोकांच्या कथा आणि व्यथा त्यांनी त्या लोकांच्या घरगुती, रोजच्या व्यवहाराच्या भाषेतून मांडल्या, कारण त्या त्यांनी त्या लोकांसाठी/त्याच लोकांसाठी लिहिल्या होत्या. तथाकथित लोकांच्या भाषेत लिहिणाऱ्या आजच्या लेखकांची भाषा जिथे मोठ्या मुश्किलीने प्रोफेसरांसारख्या विद्वान लोकांच्या डोक्यात शिरू शकते तिथे सामान्य लोकांना समजण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

## सामान्य माणसाचा आवाज

भारतीय भाषांपैकी तेलुगू आणि बंगाली या भाषांच्या साहित्यात 'प्रमाणित' किंवा 'अभिजनांची भाषा' आणि अशिक्षित/सामान्य जनांची बोलीभाषा यांच्या साहित्यातील वापराबद्दल अतिशय कटू संघर्ष झाला आहे. सुदैवाने ओरिसामध्ये हा संघर्ष कधीच उद्भवला नाही. याचे श्रेय फकीरमोहनांकडे जाते. वास्तविक पाहता राधानाथ रॉय आणि मधुसूदन राव यांनी आपल्या साहित्यातून समकालीन बंगाली भाषाशैली वापरून ओरिया वाचकांच्या मनातले अभिजात भाषेच्या वापराविषयीचे पारडे आधीच जड करून ठेवले होते. पण फकीरमोहनांनी या क्षेत्रात असा वेगळा आणि अनपेक्षित प्रवाह आणला की त्याने या साहित्यव्यवहाराला मोठाच धक्का बसला. फकीरमोहनांच्या

साहित्यातील मातीचा गंध वाचकांच्या मनात चटकन रुजला. गतशतकातील पन्नास आणि साठच्या दशकात बंगाली भाषेमधील 'अलादेर घरेर दुलाल' (श्रीमंत घरातील बिघडलेला मुलगा) आणि 'हटम पेंचार नवसा' (टेहळणी करणाऱ्या घुबडाची रेखाचित्रे) यांच्यासारख्या कादंबऱ्यांमधून बोलीभाषेचा थोडा प्रयोग करण्यात आला होता हे जरी खरे असले तरी ती पूर्णपणे जनसामान्यांची भाषा नव्हती. (ईश्वरचंद्र विद्यासागर आणि त्यांच्यासारख्या इतरजणांसारखी ही शुद्ध अभिजन भाषा नव्हती हे जरी खरे असले तरी ती त्या वेळच्या प्रमाणित भाषेपेक्षा फार वेगळी मात्र नव्हती.) 1897 मध्ये फकीरमोहनांनी ओरिया भाषेत कथा-कादंबऱ्या लिहायला सुरुवात केली, त्या वेळी खुद्द बंगाली भाषिक लोकांना या प्रयोगाचा विसर पडला होता. फकीरमोहनांच्या ओरिया भाषेतील कर्तृत्वाची तुलना करायची झाली तर ती फक्त बंगाली भाषेतील रामकृष्ण परमहसांच्या 'Nectarins talks' (कथामृत)शी करता येईल. रामकृष्णांनी देखील मातीशी असेच ईमान राखलेले होते. वाहत्या कालप्रवाहातही या दोघांची अंत:करणे, त्यांचे आत्मे अनघड, अस्पर्श राहिले होते.

इथे एक गोष्ट स्पष्ट करणे आवश्यक आहे. अर्धशतकापूर्वी वर्डस्वर्थ आणि कोलरीज यांनी 'लिरिकल बॅलाडस्'ला लिहिलेल्या प्रस्तावनेत जसा जनसामान्यांच्या भाषेचा, मंत्रशक्ती म्हणून उद्घोष केला होता तसा फकीरमोहनांनी कधीच केला नव्हता. उलट अनेक प्रकारांच्या शैलींवर त्यांची उत्तम पकड असल्याने वेगवेगळ्या शैलींच्या आवाहनांना ते सहज सामोरे गेले होते. लेखनप्रकाराच्या मागणीप्रमाणे त्यांनी प्रसंगी अगदी अभिजात भव्य शैलीचा जसा वापर केला होता तसाच अगदी रांगड्या अशा खास प्रादेशिक बोलीचाही वापर केला होता.

## राष्ट्रीय महाकाव्य

एका विशिष्ट काळात फकीरमोहनांनी मोठ्या प्रमाणात कथा आणि कादंबऱ्या लिहिल्या. वरवर पाहता हे लेखन नियोजनशून्य वाटत असले तरी या सर्व कलाकृती, कलाकृती म्हणून संपूर्ण वाटतात, एका मोठ्या अवकाशात सुव्यवस्थितपणे बसलेल्या दिसतात. त्यांच्या या कलाकृती जरी सुट्या सुट्या दिसत असल्या तरी त्या अंतर्गतरीत्या एका अखंड कलाकृतीमध्ये सांधलेल्या आहेत असे दिसते. त्यांच्यामधून जनमानसाचे एक अजोड चित्र आपल्यासमोर उभे राहते. आपल्या चार मुख्य कादंबऱ्या, बऱ्याचशा दीर्घकथा आणि काही कथांमधून ओरिसामधील सलग दोन शतकातले जनजीवनाचे दर्शन फकीरमोहनांनी आपल्याला घडविलेले दिसते. सर्व्हंटसने आपल्या 'डॉन क्विझोट'मधून असेच त्या वेळचे स्पॅनिश जीवन आपल्यासमोर उभे केले होते. पुढच्या काळात लेनिन आणि गांधींजी यांनी आपल्या कार्याच्या सामाजिक आणि राजकीय वर्तुळात सर्वसामान्य स्त्री-पुरुषांचा समावेश केला. पण त्याच्या कितीतरी



आधी फकीरमोहनांनी आपल्या साहित्यजगतात सामान्य स्त्रीपुरुषांच्या भावभावनांना उद्गार देऊन त्यांना साहित्यात स्थान दिले होते. समाजातील अमुक एका स्तरावरील व्यक्तींचा समावेश त्यांच्या साहित्यात नव्हता असे म्हणता येणार नाही. त्यांच्या विशाल साहित्यावकाशात प्रत्येक थरातील व्यक्तीला जागा मिळालेली दिसते. कारण त्यांच्या मनातील सामान्य माणसांविषयीचे प्रेम केवळ दिखाऊ नव्हते किंवा केवळ घोषणाबाजीतून निर्माण झालेले नव्हते. त्यांच्या मानवतावादी दृष्टिकोनातून प्रत्येक माणूस, प्रत्येक व्यक्ती ही कोणत्याही जातीधर्माच्या पार, केवळ मानवतेचा एक अविभाज्य घटक होती. म्हणूनच त्यांच्या साहित्यसृष्टीमध्ये राजापासून रंकापर्यंत, आदर्शवादी नायकनायिकांपासून डाकू आणि बदमाशांपर्यंत, तसेच खेड्यातील भोळ्याभाबड्या आणि लबाड पात्रांपासून शहरातील भोळसट, धूर्त आणि कारस्थानी समाजातील व्यक्तींपर्यंतच्या सर्व थरांतील लोकांचे दर्शन आपल्याला घडते. आपल्या ग्रामीण समाजाबद्दल एक प्रकारचा भाबडा अन् गोड गैरसमज आजही आपल्या मनात आढळून येतो. फकीरमोहनांच्या ठिकाणी त्याचा मागमूसही दिसून येत नाही.

आधुनिक भारतात टागोरांचा अपवाद वगळता इतका स्वच्छ, निखळ दृष्टिकोन असलेला दुसरा लेखक आढळून येणार नाही असे म्हटल्यास ते वावगे ठरू नये. उदात्त मानवतावादाचा बळी घेणाऱ्या कुठल्याही खोट्या किंवा संकुचित वृत्तीच्या आहारी ते कधीच गेलेले दिसत नाहीत.

***

11

# जीवनाचा सच्चा आरसा

मुळातच वैचारिक पिंडाचे असल्याने उचल लेखणी की लिही काहीतरी असे फकीरमोहन कधीच करत नसत. आजूबाजूला घडणारा प्रसंग किंवा घटना जेव्हा त्यांना विचार करायला, लिहायला अगदी भाग पाडेल तेव्हाच ते लेखणी उचलत असत. त्यामुळे त्यांच्या बहुतेक सगळ्या कथा-कादंबऱ्या अदृश्य पण भक्कम अशा वास्तवाच्या पायावर उभ्या असलेल्या दिसतात.

## पुन्हा उंदीर हो

फकीरमोहनांच्या 'पुन्हा उंदीर हो' या गाजलेल्या कथेचेच उदाहरण घेऊ. जिल्ह्याच्या ठिकाणी मिठाच्या खात्यात काम करणारा एक हेडक्लार्क असतो. आपली कामे करण्यासाठी त्याने आपल्या खेड्यातून एक माणूस नोकर म्हणून आणलेला असतो. जातीने हजाम असलेला हा माणूस चांगला उंचापुरा आणि जाडजूड तर असतोच पण वृत्तीनेही हरफनमौला असतो. एकदा ईस्ट इंडिया कंपनीच्या सॉल्ट डिपार्टमेंटमध्ये ग्रामीण पातळीवर निरीक्षकांची भरती होणार असते. आपला हा सेवक मालकाच्या मागे लागून ही नोकरी मिळवतो. नशिबाने मिळालेल्या जागेचा हा सेवक पुरेपूर फायदा उठवतो. एका अतिदूर, दुर्गम ठिकाणच्या खेड्यात त्याची नेमणूक होते. नवीन सरकारी पोशाखातल्या या दांडग्या सेवकाला पाहून गरीब बिचारे खेडूत लोक दबून जातात. त्यांच्या दृष्टीने तो खुद्द कंपनी सरकारचा हस्तक असतो. कालचा हा साधा हजाम त्यांचा तो समज दूर करण्याच्या भानगडीत न पडता 'जमादार साहेब' म्हणवून घेत त्यांच्यावर रोब जमवत असतो. त्या खेड्यात तो जिथे राहत असतो ते घरच त्याचे ऑफिस असते. गावातल्या एका गुराख्याच्या पोराला त्याने 'आपला' सेवक म्हणून नेमलेले असते. स्वयंपाक करणे, कपडे धुणे आणि इतर सटरफटर कामे हा मुलगा करत असतो. पण मालकाचे उष्टे ताट घासायला मात्र नकार देतो. कारण आपल्याहून हलक्या जातीच्या असलेल्या त्या माणसाचे ताट जर घासले तर आपली जात आपल्याला जातीबाहेर टाकेल अशी रास्त भीती त्याला वाटत असते. पुढे जातीच्या



दबावामुळे तो त्याचे कोणतेही काम करायला नकार देऊ लागतो. आपला 'हजाम जमादार साहेब' हा अपमान सहन करू शकत नाही, अन् विसरू तर मुळीच शकत नाही. पुढे लवकरच त्याच्याकडे एक संधी चालून येते; अन् तो या गुराख्याच्या पोराला 'घरगुती मीठ बनविण्याच्या' केसमध्ये बरोब्बर अडकवतो. पोराला पोलीस पकडतात आणि जिल्ह्याच्या ठिकाणी नेऊन हेडक्वार्टर्समध्ये हजर करतात. जमादारसाहेब असे एका दगडात दोन पक्षी मारतात. या गुराख्याच्या पोराने केलेल्या अपमानाचा बदला घेऊन त्याच्या जातभाईंना आणि सर्वच खेडूतांना धडा शिकवणे हा एक आणि मीठचोर पकडून दिल्याबद्दल सरकारकडून बक्षीस मिळवणे हा दुसरा! आपली चाल फत्ते झालेली पाहून शेफारलेला हा जमादार मधल्या काळात गावातल्या सगळ्यांचा, अगदी वृद्ध ब्राह्मणाचादेखील अपमान करतो. क्षुब्ध झालेला तो ब्राह्मण त्याला मूक शाप देतो 'उंदीर होतास, पुन्हा उंदीर हो!' म्हणजेच पूर्वी ज्या जागेवर होतास त्या जागेवर परत जा!

इकडे गुराख्याच्या पोरावर खटला चालतो अन् मॅजिस्ट्रेटच्या लक्षात येते की या पोराला निष्कारण या खटल्यात गोवले गेलेले आहे. मॅजिस्ट्रेट त्याला निर्दोष म्हणून सोडून देतो. जमादार साहेबांची खपामर्जी झाली तर ते पुढेमागे आपल्यालाही अशा प्रकारे खटल्यात गुंतवू शकतात ही गोष्ट खेडुतांच्या लक्षात येते. ती मंडळी दरमहा जमादाराला काही चिरीमिरी देऊन त्याला खूष ठेवू लागतात. सगळे कसे छान सुरळीत चालू असते, पण हळूहळू त्या खात्याच्या लोकांच्या लक्षात एक गोष्ट येऊ लागते की, हे जमादारासारखे निरीक्षक लोक खेड्यातील लोकांना त्यांच्याबद्दल वाटणाऱ्या खोट्या भीतीचा फायदा घेऊन आपल्या तुंबड्या भरत आहेत व त्यामुळे आपल्या खात्याला जबरदस्त नुकसान सहन करावे लागते आहे. असे भ्रष्ट निरीक्षक शोधून काढण्यासाठी सरकार एक दक्षता पथक नेमते. सगळ्यात पहिले जे काही भ्रष्ट निरीक्षक पकडले जातात त्यात आपल्या या जमादार साहेबांचाही नंबर लागतो. त्यांची नोकरी तर जातेच पण त्यांना तुरुंगवासाची शिक्षाही होते.

त्या काळी तुरुंगात जाऊन येणे म्हणजे महाभयंकर पाप समजले जात असे. हे पाप धुवून काढण्यासाठी मोठी रक्कम खर्च करून प्रायश्चित्त घेण्याचे काही धार्मिक विधी करावे लागत असत. आधी कोर्टकचेरीत करावा लागलेला खर्च अन् त्यात प्रायश्चित्तासाठी खर्च झालेला पैसा यामुळे बिचाऱ्या हजाम-जमादारावर जवळजवळ भिकेला लागायची पाळी येते, अन् तो आपला पूर्वापार चालत आलेला हजामाचा धंदा पुन्हा सुरू करतो. अशा रीतीने ब्राह्मणाने दिलेला 'पुन्हा उंदीर हो' हा शाप खरा ठरतो.

ही गोष्ट फकीरमोहनांनी अगदी काही नवीन तयार करून सांगितली नव्हती किंवा ब्राह्मणाचा शाप कसा नेहमीच खरा ठरतो हे ठसविण्यासाठी त्यांनी ती लिहिली नव्हती. हिंदू समाजात जातीची जी उतरंड आहे, तिच्या सर्वांत वरच्या स्थानावर

ब्राह्मण असतो तर सर्वांत खालच्या जागी हजाम असतो. या दोन टोकांच्या व्यक्तींना समोरासमोर आणून, प्रसंगी दोघेही कोणत्या थराला जाऊ शकतात अन् कसे जातात हे दाखविण्यासाठी फकीरमोहनांनी ही गोष्ट नव्याने लिहिली आहे. फकीरमोहनांच्या बहुतेक सगळ्या कथा भोवतालच्या समाजाच्या बदलत्या रंगावर, व्यक्तींच्या, घटनांच्या बदलत्या रूपावर आधारित असत. वर सांगितलेली गोष्ट ही अशीच आहे. जॉन बीम्सने आपल्या आत्मचरित्रात नोंद केलेल्या गेल्या शतकातील बालसोर येथील चोरट्या पद्धतीने मीठ बनविण्याच्या एका अनुभवावर ती आधारलेली आहे. महात्मा गांधींच्या 100 वर्षे आधीच एका उदारमतवादी ब्रिटिश अधिकाऱ्याला भारतीयांच्या मीठ बनविण्याच्या नैसर्गिक अधिकाराची जाणीव व्हावी ही किती विलक्षण गोष्ट आहे!

### लछम्मा

फकीरमोहनांनी वास्तव घटनांवर आधारित अशा ज्या कादंबऱ्या लिहिल्या आहेत त्यातील काही कादंबऱ्यांविषयी अधिक विस्ताराने आता विचार करू या. साधारण 1740 च्या सुमाराला अलीवर्दी खान हा बंगाल, ओरिसा आणि बिहारचा नबाब बनला. त्या वेळी दिल्ली आणि आग्र्याचे मुघल शासक केवळ नामधारी उरले होते. एकदम धाड घालणाऱ्या मराठा घोडेस्वारांच्या टोळ्यांनी आजूबाजूचा प्रदेश त्रस्त झाला होता. भोसल्यांच्या राजधानीच्या ठिकाणाहून म्हणजेच नागपूरहून एकदम टोळ्याटोळ्यांनी लुटीसाठी बाहेर पडणाऱ्या घोडेस्वारांना ओरिसाचे जणू सुपीक कुरणच सापडले होते. अलीवर्दीची राजधानी मुर्शिदाबाद त्यामानाने पुष्कळ दूर होती. त्यामुळे ओरिसातील शेकडो 'खंदायत' प्रमुखांनाच या लुटारू मराठा स्वाऱ्यांचे चटके सोसावे लागत असत. बरे, या धाडी इतक्या अचानक होत आणि इतक्या अचानक संपत की त्यांना धड प्रतिकार करणेदेखील शक्य होत नव्हते. मुख्य म्हणजे हे कुणी शूर शिपाई नव्हते. मुळात ते भुरटे चोरलुटारू आणि हुल्लडबाज लोक होते. त्यामुळे आमनेसामने लढाई न करता गावाबाहेर राहणाऱ्या सामान्य लोकांना लुटणे, वेळप्रसंगी थोडाफार प्रतिकार झाला तर पूर्ण गाव पेटवून देणे यातच त्यांना आनंद वाटत असे.

आधीच्या स्वतंत्र हिंदू राजांच्या अखत्यारीमध्ये जसा ओरिसा सुभा गंगेपासून गोदावरीपर्यंत पसरलेला होता तसाच तो आताही होता. मराठ्यांचा उपद्रव हळूहळू या सुभ्याच्या पश्चिम भागापासून उत्तर–पूर्व भागापर्यंत वाढत चालला होता. वर्षानुवर्षे या भागातील लोक या पेंढारी मराठ्यांच्या सैतानी कृत्यांना बळी पडत होते, आक्रंदत होते. त्यातच 1744 मध्ये अलीवर्दीच्या एका जनरलने दगाबाजीने भास्कर पंडीत या पेंढारी पुढाऱ्याला ठार मारले अन् लोकांच्या हालात आणखीनच भर पडली. अलीवर्दीचे शासनदेखील त्यामुळे हलून गेले.

अठराव्या शतकाच्या अखेरच्या या काळ्या, दुःखभऱ्या दिवसांची कहाणी फकीरमोहनांनी आपल्या 'लछम्मा' नावाच्या कादंबरीमध्ये रंगवली आहे.



### छमन अठगुन्ठा (सहा एकर आणि आठ गुंठे)

मराठ्यांचा पराभव करून ब्रिटिश 1803 मध्ये ओरिसात आले आणि त्यांच्या-बरोबर आल्या बंगाली ऑफिसरांच्या झुंडीच्या झुंडी. 1804 आणि 1817–18 मध्ये ओरिसात ब्रिटिश शासनाविरुद्ध 'पाईक' (Paik) बंडे झाली होती. त्याचा परिणाम म्हणून इथे जे खंदायत लष्कर राज्य करत होते, त्यांना आपल्या शस्त्रास्त्रांना तर मुकावे लागलेच होते पण ते जी जमीन पिढ्यान्‌पिढ्या कसत आले होते तिच्यावरचे त्यांचे हक्कही संपुष्टात आणले गेले होते. देशभक्तांच्या त्या बंडाचा इशारा ध्यानात घेऊन ब्रिटिशांनी काही अतिशय कडक कायदे अमलात आणले होते. या कायद्याच्या फटक्याने हजारो सधन शेतमालक आणि पिढीजात शिपाईगडी रातोरात राजाचे रंक झाले होते. भिकारी किंवा हमालांच्या पातळीवर आले होते. त्या काळी ओरिसात 'कवडी' हे सर्वमान्य चलन होते. पण ब्रिटिशांनी ते 'कायदेशीर चलन नाही' म्हणून रद्द केले आणि नवीन चलन वापरण्याची सक्ती चालू केली. हे चलन फार थोड्या प्रमाणात उपलब्ध असल्याने आणि लोकांजवळचा पैसा कवड्यांच्या रूपात असल्याने सामान्य लोकांना या चलनात कराचे पैसे भरणे शक्य नव्हते. परिणामी ओरिसातील हजारो लोकांची शेकडो एकर जमीन त्यांच्या हातातून निसटून गेली. पण एवढ्यानेही त्यांचे दुर्दैव संपले नव्हते. ब्रिटिशांनी एक नवीन गुंतागुंतीची अशी महसूल गोळा करण्याची पद्धती अमलात आणायला सुरुवात केली होती. या कुप्रसिद्ध 'सूर्यास्त कायद्या'मुळे (Sunset Law) तर कलकत्त्याच्या सरकारी ऑफिसमधले साधे कारकूनही ओरिसातल्या ऐतिहासिक इस्टेटीचे धनी झाले होते. त्यामुळे त्या काळाच्या समाजात एक अभूतपूर्व गोंधळाचे वातावरण निर्माण झाले होते. 'अनुपस्थित जमीनदार' ही नवीनच जमात उदयाला आली होती. नवीन रेव्हेन्यू नियमांच्या आधाराने जमिनीचे हस्तांतरण सोपे झाले होते अन् ब्रिटिश कोर्टातील वकिलांना तर या कायद्याच्या कृपेने घबाडच हाती आल्यासारखे झाले होते. मात्र यात बळी जात होती ती कायद्याबद्दल अनभिज्ञ असलेली साधीभोळी शेतकरी जनता अन् सामान्य भूधारक मंडळी!

आधी पेंढाऱ्यांनी दिलेल्या नरकयातना जवळजवळ पन्नास वर्षे सहन केल्यानंतर आता पुढची पन्नास वर्षे ब्रिटिशांनी आपल्या सुरुवातीच्या काळात दिलेल्या या यमयातना भोगणे ओरिसातल्या लोकांच्या नशिबी आले होते. आगीतून निघून फुफाट्यात पडावे तशी होरपळ देणारे हे दिवस फकीरमोहनांनी आपल्या 'छमन अठगुन्ठा' या कादंबरीत पुन्हा जिवंत केले आहेत.

### माम् (मामा)

गेल्या शतकाच्या साठीच्या दशकापर्यंत ओरिसात नवीन शिक्षणाला जेमतेम सुरुवात झाली होती. मोठ्या शहरांमध्ये एक्का–दुक्का इंग्रजी शाळा सुरू झाल्या

होत्या. उडीया लोकांच्या शिक्षणाची त्यांच्याच भूमीत असलेली शिक्षणाची ही दुरवस्था सुदैवाने ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या लक्षात आली आणि त्यांनी हायस्कूल पास केल्याचे सर्टिफिकेट ज्यांच्याजवळ आहे त्या ओरिया लोकांना सरकारी ऑफिसेसमधल्या खालच्या स्तरावरच्या जागा उपलब्ध करून दिल्या. मुळात श्रीमंत घरांमध्ये जन्म घेतलेल्या पण आता परिस्थितीने वाईट दिवस आलेल्या काही सुदैवी मुलांना अशा नोकऱ्या मिळाल्या होत्या. ही मुले गावे सोडून शहरात गेली, तिथे त्यांनी घरे घेतली, बायकामुलांना बोलावून घेतले आणि ती आता तिथेच स्थायिक झाली होती. एकदा रेव्हेन्यू ऑफिसमधल्या मायाजालात प्रवेश मिळाल्यावर या मुलांनी बऱ्यावाईट अशा जमेल त्या सर्व मार्गांचा अवलंब करून आपली गेलेली श्रीमंती, इस्टेटी परत आणण्याचा चंग बांधला होता. तशी सुरुवात त्यांनी केली होती.

गेल्या शतकाच्या अखेरच्या काळात ओरिसातल्या नव्याने विकसित होणाऱ्या शहरांमध्ये जी सामाजिक स्थित्यंतरे होत होती त्या स्थित्यंतरांचे अतिशय भेदक चित्रण फकीरमोहनांनी आपल्या 'मामू' कादंबरीत केले आहे. खेड्यातील सामान्यातील सामान्य स्त्री-पुरुषांनी सत्ता आणि पैसा मिळविण्यासाठी वापरलेल्या सैतानी युक्त्या, कपट-कारस्थाने यांचे जे चित्र फकीरमोहनांनी आपल्या 'छमन अठगुन्ठा'मध्ये केले आहे, त्याला समांतर असे हे शहरी समाजाचे चित्रण त्यांनी 'माम्'मध्ये केले आहे.

## प्रायश्चित्त

1918 साली फकीरमोहनांचे निधन झाले, तेव्हा ओरिसा बऱ्याच बाबतींमध्ये आधुनिक झाला होता. तसे पाहिले तर ओरिया साहित्यात आधुनिक पर्वाची सुरुवात राधानाथ राय आणि मधुसूदन राव यांच्या संयुक्त 'कवितावली'ने 1872 मध्येच झाली होती. त्यामुळे 1878 च्या सुमाराला आपल्या समृद्ध साहित्यिक वारश्याची जाण ओरिया समाजाला झाली होती. आपल्या भाषेचे गतवैभव पुन्हा प्राप्त करून घेण्यासाठी काय करायला हवे याचीही कल्पना तोपर्यंत त्यांना आली होती. या प्रयत्नांचा एक भाग म्हणून 1903 साली काही सुशिक्षित तरुणांनी 'उत्कल संमेलना'च्या झेंड्याखाली एकत्र येऊन, सर्वदूर पसरलेल्या ओरिया भाषिक लोकांचा शोध घेण्याची, त्यांची माहिती संकलित करण्याची मागणी केली. त्याच वेळी ओरिसातल्या ब्रिटिश राजवटीला 100 वर्षे पूर्ण झाली होती. एम. एम. दास आणि पंडित गोपबंधू दास यांच्यासारख्या दिग्गजांनीही ओरिया लोकांच्या या राजकीय मागण्यांचा पुनरुच्चार प्रोव्हेन्शियल आणि इम्पेरियल कौन्सिल्समध्ये करण्यास सुरुवात केली. कटक येथे त्याचवेळी 'उत्कल साहित्य समाज' या ओरिया साहित्य अकादमीची स्थापना करण्यात आली. ओरिया साप्ताहिके आणि मासिके यांच्यामधून ओरिया लोकांना आपल्या 'पूर्ववैभवाचे' स्मरण करून देणाऱ्या साहित्याचा मारा सुरू झाला.



त्याच वेळी कलकत्ता, कटक या शहरांमधून नवशिक्षित पिढी बाहेर पडत होती. ही पिढी पाश्चात्य प्रभावाने भारलेली होती. साहजिकच त्यांच्यात आणि समाजात हळूहळू अंतर निर्माण होऊ लागले होते. समाजमनावरचा जातीजमातींच्या दृढतेचा पगडा ढिला पडू लागला होता. त्यामुळे जातीबाहेर जाऊन आपल्या पसंतीच्या मुलीशी लग्न करणाऱ्या तरुणांची संख्या वाढू लागली होती. नवीन सुधारणांमध्ये मद्यपान आणि दिखाऊ शिष्टाचार तसेच सौंदर्यासक्ती यांचे अस्तित्वही ठळकपणे सर्वदूर उठून दिसू लागले होते.

फकीरमोहनांची 'प्रायश्चित्त' ही शेवटची कादंबरी 1915 मध्ये प्रकाशित झाली. वर सांगितलेल्या सामाजिक घडामोडींचे प्रतिबिंब या कादंबरीमध्ये पडले आहे. या काळातील घडामोडींचा वेध घेत घेत सुरू होणारी ही कादंबरी महात्मा गांधींच्या चळवळीने प्रभावित झालेल्या काळात येऊन संपते. आपल्या उतारवयात म्हणजे जवळजवळ पंचाहत्तराव्या वर्षी फकीरमोहन मद्रास येथे भरलेल्या भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या अधिवेशनात गांधींना भेटले होते. त्यांच्याशी त्यांची बातचीतही झाली होती. 1918 सालापर्यंत सगळा भारत देश गांधीजींना 'महात्मा' म्हणून ओळखायला लागला होता. पण फकीरमोहनांनी केलेल्या विविध लेखनप्रकारांपैकी एकातही कुठेही एका शब्दानेही गांधीजींचा उल्लेख नाही याचे आश्चर्य वाटते. त्यांच्या पिढीतील बहुतेक जणांप्रमाणे कदाचित त्यांचाही 'Pax ब्रिटानिका'वर दृढ विश्वास असावा. पण त्यांच्यातला मर्मज्ञ बुद्धिजीवी लेखक मात्र सदैव जागरूक होता. आपल्या लिखाणातून त्यांनी भारतीय लोकांच्या लाकूडतोड्या होण्याची आकांक्षा बाळगण्याच्या किंवा पाणक्याची नोकरी करण्याच्या अल्पसंतुष्ट वृत्तीवर तसेच अशा लोकांच्या जिवावर इथे आपल्या भूमीत ऐष करणाऱ्या गोऱ्या लोकांवर कठोर कोरडे ओढले आहेत.

1897 मध्ये लिहिलेल्या आपल्या 'छमन अठगुन्ठा' नावाच्या कादंबरीतील एका 'उपहासिके'मध्ये खेड्यातल्या पाणवठ्याचे वर्णन करताना ते लिहितात – ''तळ्याच्या काठाजवळच्या चिखलात तुम्हाला असंख्य छोटे छोटे बगळे सकाळपासून संध्याकाळपर्यंत छोटे छोटे मासे धुंडाळताना दिसतील, फक्त कसेबसे पोट भरण्याची धडपड करताना दिसतील. पण त्याच वेळी जरा इकडे नजर टाकलीत तर न जाणो कुठून दोन-चार कारमोरन्टस् उडत इथे येतात. तळ्याच्या पाण्यात दोन-चार डुबक्या मारतात अन् मोठे मोठे मासे पकडून, त्यांच्यावर ताव मारून भरल्यापोटी उडूनदेखील जातात. सूर्यप्रकाशात तळ्याच्या उंच काठावर तृप्तपणे पंख फुलारून बसलेला कारमोरन्ट अगदी एखाद्या पार्टीच्या प्रसंगी गाऊन फुलवून बसलेल्या इंग्रजी मडमेसारखा दिसतो. अरे भोळसट भारतीय बगळ्यांनो, पहा पहा, दूर देशावरून आपल्या देशात आलेले हे इंग्रजी कारमोरन्टस् उत्तमोत्तम माशांनी आपली रिकामी पोटे इथे भरून आनंदाने परत जात आहेत. अन् तुम्ही! या तळ्याच्या काठावरच्या झाडांच्या ढोलींमध्ये वर्षानुवर्षे

राहत असूनही दिवसभर मरमर करून कसेबसे पोट भरू शकता आहात. ध्यानात घ्या! जगण्यासाठी लढा करण्याची आता वेळ आली आहे. थोड्याच दिवसांत आणखी कारमोरन्टस् इथे येतील, तळ्यातले सगळे मासे ते फस्त करतील. तुम्हाला जगायचे असेल तर त्या कारमोरन्टस् सारखे वागायला शिका. खोल पाण्यात पोहायला शिका. ते शिकला नाहीत तर पुढे फार काळ तुम्ही जगू शकाल किंवा तगू शकाल असे मला तरी वाटत नाही.''

या रूपकात्मक कथेतून जळजळीतपणे ध्वनित होणारा त्यांचा द्रष्टेपणा आणि राष्ट्रप्रेम पन्नास वर्षांपूर्वीच्या वाचकांनादेखील स्पष्टपणे जाणवले असणार.

## जिवंत स्त्री–पुरुष

फकीरमोहनांच्या कादंबऱ्यांची चर्चा करताना दोन गोष्टी कायम लक्षात ठेवणे जरुरीचे आहे. एक म्हणजे त्यांचे औपचारिक शिक्षण फक्त एखाददुसरे वर्ष झाले होते आणि दुसरी म्हणजे साहित्यातील रूढ मार्ग सोडून नवी वाट रुळविण्याचा विचार तर सोडाच, आपण व्यावसायिक लेखक म्हणून गाजावे अशी देखील इच्छा त्यांनी कधी केली नव्हती. ज्या ज्या वेळी त्यांना जे जे भावले, सांगावेसे वाटले ते ते त्यांनी आपल्या काव्यातून, महाकाव्यातून, कथा-कादंबरीतून आणि निबंधांमधून सांगितले. कलाकृतीच्या सौंदर्यरचनेकडे त्यांनी जसे खास लक्ष दिले नाही तसेच वाचकांवर काही विशिष्ट परिणाम घडवून आणायचा या हेतूनेही त्यांनी कधी लेखन केले नाही. आपल्याला त्यांच्या साहित्यातून भेटणारे स्त्री–पुरुष त्यामुळेच अतिशय अकृत्रिम, नैसर्गिक, वास्तव आणि सच्चे वाटतात, मग ते खेड्यातले गावरान, खालच्या जातीजमातीचे गावंढळ खेडूत असोत की शहरात राहणारे बाबू असोत! आपल्या अतिसूक्ष्म अशा निरीक्षणशक्तीमधून जन्मजात अशा कुशल पण चिकित्सक कारागिरीने फकीरमोहन या सगळ्या व्यक्ती आपल्यासमोर सजीव उभ्या करतात. बेनेट किंवा हार्डी यांच्या साहित्यात आढळून येणारा शिस्तबद्ध सौंदर्याविष्कार, फकीरमोहनांच्या साहित्यात शोधू पाहणे किंवा आधुनिक साहित्यातला संज्ञाप्रवाह त्यांच्या साहित्यात धुंडाळणे वेडेपणाचे ठरते ते याच कारणाने! फकीरमोहन आपल्या पात्रांमध्ये सच्चेपणाची अशी काही संजीवनी फुंकतात की त्यांची पात्रे सजीव होतात, फकीरमोहनांच्या अनुभूतीमध्ये असलेल्या व्यक्तींप्रमाणे ती आपल्यालाही आपली, परिचित अशी वाटू लागतात.

नंतरच्या काळात ओरिया साहित्यात अनेक परिवर्तने घडून आलेली दिसतात. साहित्य काही पावले पुढे गेल्याचेच ते लक्षण समजले जाते. पण या काळातदेखील अशी किंवा इतकी जिवंत भासणारी शहरी किंवा ग्रामीण पात्रे, त्यांची भाषा दुसरा कुठलाही साहित्यिक निर्माण करू शकला नाही. कुठल्याही प्रसिद्ध गोष्टीची वैशिष्ट्ये,



लकबी, फॅशन, लेबल्स किंवा प्रचार यांची दिवसाढवळ्या होणारी निर्लज्ज नक्कल किंवा वाटमारी आपल्याला आजकाल सतत पाहायला मिळते. पण खास ओरिया पद्धतीची पात्रे निर्माण करण्याच्या फकीरमोहनांच्या प्रतिभेची नक्कल करणे आजवर तरी कुणालाही शक्य झालेले नाही. फकीरमोहनांच्या साहित्यातल्या व्यक्ती फकीरमोहनांच्या जमिनीशी दृढ नाते सांगणाऱ्या मनोभूमीत रुजून वर आलेल्या आहेत हे त्यामागचे कारण असावे असे दिसते.

पन्नास वर्षांपूर्वी लिहिल्या गेलेल्या त्यांच्या साहित्यात त्यांचे समाजातील खालच्या स्तरावरच्या माणसांबद्दल अतीव सहानुभावाने विचार करणारे मन आपल्याला जसे दिसते, तसेच तत्कालीन समाजातील सैतानी वृत्तीच्या समजल्या जाणाऱ्या उच्चवर्गीतील चांगले गुण शोधून ते लोकांसमोर आणण्याचा त्यांचा वस्तुनिष्ठ दृष्टिकोनही आपल्या नजरेस येतो. सौंदर्यदृष्टी आणि वस्तुनिष्ठता यांचे निर्विवाद संतुलन त्यांनी आपल्या साहित्यात उत्तमपणे साधलेले दिसते. व्यक्ती कोणत्याही जातीची, धर्माची किंवा समाजातल्या कोणत्याही स्तरातली असली तरी व्यक्तिगत जीवनात ती किती नैतिकतेने वागते यावरच तिचे व्यक्तिगत जीवनातले सुखदु:ख अवलंबून असते. समाजाला योग्य ते मार्गदर्शन करणारी व्यक्ती ईश्वर सदैव कोणत्या ना कोणत्या स्तरात जन्माला घालतच असतो, असा फकीरमोहनांचा दृढ विश्वास होता.

ग्रामीण वातावरणात साकार झालेल्या त्यांच्या 'छमन अठगुन्ठा' या शोकांतिकेमध्ये त्यांच्या या धारणेचे स्पष्ट प्रतिबिंब आपल्याला दिसून येते.

त्यातील रामचंद्र मंगराजा हा ओरिसातल्या एका छोट्याशा खेड्यात राहणारा अनाथ मुलगा असतो. दारोदार भिक्षा मागून तो जगत असतो. अंगभूत हुशारीने त्याने समाजातली आपली जागा अन् पत काय आहे हे ओळखले असते आणि नशिबाच्या नाकावर टिच्चून, दुर्दैवाशी सामना करून एक ना एक दिवस त्या गावातली सर्वात श्रीमंत व्यक्ती होण्याचा निश्चय त्याने केला असतो. सुरुवातीला अगदी छोटा धंदा, मग छोट्या छोट्या रकमा व्याजाने देणे असे करत करत तो पैसे जमा करतो. हळूहळू धंद्यात त्याचा जम बसू लागतो.

एक मुस्लीम जमीनदार मंगराजाच्या खेड्याचा मालक असतो. हा जमीनदार स्वत: दूर मिदनापूरला राहत असल्याने आपल्या इस्टेटीचा कर वसूल करण्यासाठी त्याने एक इस्टेट एजन्ट नेमलेला असतो. मंगराजा हा सगळा व्यवहार लक्षपूर्वक पाहत असतो. एकदा मात्र अशी वेळ येते की, हा एजन्ट कराची रक्कम वसूलच करू शकत नाही. जमीनदाराचे वारंवार तगादे येतात. पण एजन्ट आपली मजबूरी त्याला कळवतो.

इथे मंगराजा धूर्तपणे पुढे येतो आणि जमीनदाराचे मन वळवून त्या एजन्टची जागा मिळवतो. नवीन एजन्ट म्हणून नेमणूक झाल्यावर कोर्टाच्या एका लिलावात

जमीनदाराची सगळी इस्टेट आपल्या घशात घालणे हा मंगराजासारख्या धूर्त माणसाच्या डाव्या हाताचा मळ असतो.

आता मंगराजा जमीनदार झाला असतो. कुठूनही अन् कशाही प्रकारे इस्टेटी, जमिनी बळकवायचा तो सपाटा लावतो. कालपरवापर्यंत दारोदार भीक मागणारा हा मुलगा हां हां म्हणता पंचक्रोशीमध्ये सर्वांत धनाढ्य असा सावकार म्हणून ओळखला जाऊ लागतो.

त्याच्या गावाजवळच विणकरांची एक छोटी वस्ती असते. इथली माणसे आपले जीवन शांतपणाने, आपल्या पद्धतीने जगत असतात. आपल्या पंचायतीच्या प्रमुखाच्या म्हणण्यानुसार ते वागत असतात. त्यांचा पंचायत प्रमुख एक भाग्या नावाचा भोळसट माणूस असतो. त्याची बायको सारिया ही त्याला अगदी शोभण्यासारखी असते. एकमेकांना अतिशय अनुरूप असलेल्या या जोडप्याला दुर्दैवाने मूलबाळ नसते. त्यामुळे सारिया आपल्या अतृप्त मायेचा वर्षाव आपल्या पाळलेल्या गाईवर करत असते.

त्या गावातल्या सगळ्यात सुपीक समजल्या जाणाऱ्या जमिनीचा एक सहा एकर बत्तीस गुंठ्याचा तुकडा या भाग्याच्या मालकीचा असतो. इस्टेटी गिळंकृत करण्याच्या मोहिमेवर निघालेल्या मंगराजाचा अश्वमेधी घोडा या जमिनीच्या तुकड्यापर्यंत येऊन अडतो. तो तिथे थांबेल म्हणता?

खरे तर आतापर्यंत मंगराजाची संपत्तीची भूक भागलेली असते. पण माणसाला तिच्याहूनही प्रबळ अशी आणखी एक भूक असते. वासनेची भूक! तिचे काय? खरे तर त्याच्या घरी त्याची अतिशय सद्गुणी अशी बायको असते. पतीच्या पापांच्या राशींमध्ये जळणारी जणू ती पवित्र ज्योत असते! पण वासनेने अंध झालेल्या मंगराजाच्या नजरेला तिचे पवित्र, सौम्य तेज आकृष्ट करू शकत नाही. तो चंपा नावाच्या एका बदमाश कुलटा स्त्रीच्या नादी लागतो. हळूहळू चंपा त्याच्यावर, त्याच्या घरादारावरच नव्हे तर त्याच्या सर्व व्यवहारांवर ताबा मिळवते.

मंगराजाचा डोळा भाग्याच्या सहा एकर बत्तीस गुंठे जमिनीवर आहे हे लक्षात येताच चंपा एक वेगळीच खेळी खेळायचे ठरवते. ती आपला मोहरा भाग्याच्या पत्नीकडे वळवते. निपुत्रिक असल्याच्या तिच्या दुःखावर चंपा हळुवारपणे फुंकर घालते. पुत्रप्राप्तीसाठी वेगवेगळे उपाय तिला सुचवते. त्यातलाच एक उपाय असा असतो – गावातील तळ्याच्या काठी असलेल्या वडाच्या झाडाखालच्या देवीच्या मूर्तीसाठी मंदिर बांधणे! नवऱ्याच्या मागे लागून तिने देवीसाठी मंदिर बांधून घेतले तर नक्कीच देवी खूष होऊन तिच्या पदरात मूल घालेल, असे ती सारियाच्या मनात भरवते. सुरुवातीला हो–ना करणारी सारिया अखेर चंपाच्या गोड बोलण्याला फसते आणि आपल्या पतीचे मन वळवून त्याला मंदिर बांधायला तयार करते.

पण मंदिरासाठी पैसा कसा उभा करणार? पैसा उभा करण्यासाठी भाग्या आपला



जमिनीचा तुकडा मंगराजाकडे गहाण टाकतो. निरक्षर असल्याने भाग्या मंगराजा जे कागद पुढे करतो त्यावर मुकाट सह्या करतो. या लिहून घेतलेल्या कर्जाच्या बदल्यात मंगराजा दोन-चार गाड्या भरून दगड झाडाखालच्या देवीजवळ आणून टाकतो. दगडावर दगड ठेवून मंदिर कसे बांधले जाईल या विचारात बिचारा भाग्या अडकून पडतो. हळूहळू गहाणाची मुदत संपते अन् मंगराजा भोळ्या भाग्याविरुद्ध कायदाकानूनांची लढाई सुरू करतो. भाग्याविरुद्ध त्याला अगदी सहजपणे डिक्री मिळते. गहाण ठेवलेली सहा एकर बत्तीस गुंठे जमीन बळकावून तो गप्प असत नाही तर व्याज आणि दाव्याचा खर्च यांच्यापोटी त्या गरीब जोडप्याचे घरही तो घशयात घालतो. भाग्या अक्षरशः रस्त्यावर येतो. त्याचे घरदार गिळंकृत झाल्यावर चंपाची विखारी नजर आता सारियाच्या गायीवर जाते. गायीचे नाव असते नेता. या जोडप्याची ती एकमेव चालतीबोलती दौलत असते. पण त्याहीपेक्षा जास्त म्हणजे ती सारियाचे जीवनसर्वस्व असते. या वांझ बाईच्या प्रेमाचे, जगण्याचे ती एकमेव निधान असते. कायद्यानुसार मंगराजाची माणसे सारियाच्या गाईला जबरदस्तीने ओढत खेचत घेऊन जातात. गरीब बिचारी सारिया रडत ओरडत त्यांच्यामागे धावत जाते. ते लोक थेट मंगराजाच्या घराच्या मागच्या पडवीत पोहोचतात. सारियाही तिथे पोहोचते. मोठमोठ्याने आक्रोश करत ती तिथे उभी असते. तिला तिथून हटविण्याचे खूप प्रयत्न होतात, पण ती तिथून हटायला मुळीच तयार नसते. मंगराजाचे गुंड तिला बेदम मारहाण करतात. गाईच्या ताटातुटीने आधीच विकल झालेली सारिया या मारहाणीपुढे टिकाव धरू शकत नाही. मंगराजाच्या घराच्या मागच्या पडवीत ती प्राण सोडते.

त्याच वेळी इकडे मंगराजाची सती पत्नीही मरण पावते. सारियाच्या मृत्यूने तिच्या नवऱ्याला म्हणजे भाग्याला वेड लागते. अन् अचानकपणे घटनांना वेगळे वळण लागते. पोलीस चौकशी सुरू होते. मंगराजा पकडला जातो. त्याच्यावर खटला चालतो. पण सारियाच्या मृत्यूला तो जबाबदार नाही असे सिद्ध होते; तसेच भाग्याच्या जमिनीचा, घराचा त्याने घेतलेला ताबाही कायदेशीर ठरतो. सारियाची गाय जबरदस्तीने नेल्याबद्दल मात्र त्याला काही महिने तुरुंगवासाची शिक्षा होते.

त्या काळी गुन्हेगार कैद्यांना आणि वेड्या लोकांना एकाच तुरुंगात ठेवण्यात येत असे. त्यामुळे कटकच्या तुरुंगात मंगराजा आणि वेडा भाग्या एकत्र येतात.

ज्यांच्या कायदेविषयक अज्ञानाचा फायदा घेऊन मंगराजाने फसवले होते असे अनेक दुर्दैवी लोक त्याच तुरुंगात असतात. दुखावलेले हे लोक एका रात्री बरोबर आपला सूड उगवतात. ते मंगराजाला बेदम ठोकून काढतात. तुरुंगाच्या दवाखान्यात मंगराजावर उपचार चालू असतात. तिथे वेडा भाग्या त्याच्यावर धावून जातो अन् त्याचे नाक कापण्याचा प्रयत्न करतो. या धक्क्याने बिचारा मंगराजा अधिकाधिक खचत जातो. त्याची परिस्थिती लक्षात घेऊन त्याला वेळेआधीच तुरुंगातून सोडून

दिले जाते. भकास, उजाड झालेल्या घराच्या पडवीमध्ये अर्धमेल्या अवस्थेत मंगराजा पडून असतो. हळूहळू त्याला भ्रम होतो. या भ्रमात, शेवटच्या घटका मोजत असताना त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडत असतात ते – 'सहा एकर बत्तीस गुंठे' – 'सहा एकर बत्तीस गुंठे' असे! अन् त्याची अंधूक होत जाणारी नजर खिळलेली असते त्याच्या गुणवती पत्नीच्या फोटोवर!

मंगराजा कैदेत असताना चंपा त्याचा सगळा पैसाअडका, दागदागिने घेऊन चुपचाप गाव सोडून पळून जाते. मंगराजाचा न्हावी गोविंदा याच्याबरोबर कटक इथे जाऊन तिथे संसार थाटण्याचा तिचा बेत असतो. पण गोविंदाचे लग्न झालेले असते, इतकेच नाही तर तो एका मुलाचा बापही असतो. पण त्याला फक्त लुटीमधला वाटा हवा असतो. त्या पैशांमधून त्याला एक दुकान थाटायचे असते; गावात एक इज्जतदार माणूस म्हणून नाव कमवायचे असते. पैशासाठी तो तिच्याबरोबर निघतो. रात्री ते गावाबाहेरच्या एका निर्जन धर्मशाळेत पोहोचतात. तिथे दोघे आपापले बेत एकमेकांना सांगतात अन् त्यावरून त्यांचे भांडण सुरू होते. हळूहळू भांडण विकोपाला जाते. रागावलेला गोविंदा बाहेरच्या पडवीत भिंतीवर घुश्श्यात बसला असतो. चंपा मात्र मस्त पोटभर जेवून खाटेवर बिनधास्त घोरत पडली असते. सगळी दौलत असलेली पोतडी तिने आपल्या उशाखाली घेतलेली असते.

थकलेला अन् भुकेने व्याकूळ झालेला गोविंदा बराच वेळ तसा बसतो. विचार करत राहतो. शेवटी निश्चयाने उठतो, आपल्या पिशवीतून तीक्ष्ण वस्तरा काढतो, हळूच आतल्या खोलीत जातो अन् अंधारातच तो वस्तरा चंपाच्या गळ्यावरून फिरवतो. चंपा झोपेतच प्राण सोडते. गोविंदा पैशाची पोतडी घेऊन जवळच्या फेरीघाटाकडे धाव घेतो. झोपलेल्या फेरीबोटवाल्याला उठवतो. एका प्रवाशासाठी फेरीबोट काढायला तो तयार नसतो. गोविंदा त्याला मोठ्या भाड्याचे आमिष दाखवतो. तो तयार होतो. रात्र हळूहळू सरत असते. ते धारेच्या मध्यापर्यंत पोचतात तेव्हा अंधूक प्रकाशकिरणात फेरीवाल्याला गोविंदाचे रक्ताने भरलेले कपडे दिसतात. तो गोविंदाला त्याबद्दल खोदून खोदून विचारू लागतो. त्याचवेळी समोरच्या किनाऱ्यावर एक टपाल धावक आपली बॅग घेऊन उभा असलेला त्यांना दिसतो. आता हा आपल्याला हटकणार अन् आपल्याला पकडून देणार या भीतीने गोविंदा मंगराजाच्या त्या विषारी अन् शापित दौलतीच्या पोतडीसकट पाण्यात उडी टाकतो अन् संपत्तीसकट तळाशी पोहोचतो.

खेड्यातल्या साध्याभोळ्या लोकांच्या नशिबाचे, त्यांच्या दु:खाचे इतके प्रभावी दर्शन दुसऱ्या कुठल्याही भारतीय साहित्यकृतीमध्ये आपल्याला घडत नाही. फकीरमोहनांच्या पूर्वी कुणीही इतकी रासवट, भोळसट पात्रे इतक्या ताकदीने रंगवली नव्हती. त्यांच्या प्रत्येक कलाकृतीतील स्त्री आणि पुरुष पात्रे न्हावी, विणकर, शेतकरी, कामकरी,



अस्पृश्य अशा समाजातील विविध वर्गांमधून आपल्यासमोर स्वत:च्या सगळ्या जाणिवांसकट, जिवंतपणासकट साकार होताना दिसतात.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे 'छमन अठगुण्ठा' या शीर्षकाची ही कादंबरी लिहावी असा विचारही फकीरमोहनांच्या मनात कधी आला नव्हता. त्याचे असे झाले की, 'उत्कल साहित्य' नावाचे नियतकालिक चालवणारे त्यांचे संपादक 'विश्वनाथ कार' हे कधीपासून त्यांच्यामागे 'तुझी एखादी तरी कथा मला दे' म्हणून लागले होते. म्हणून जवळजवळ वीस वर्षांच्या काळानंतर त्यांनी ही कथा लिहायला सुरुवात केली, पण लिहिता लिहिता तिचे रूपांतर कादंबरीत झाले.

इंग्रजी साहित्यात चार्लस डिकन्सच्या 'पिकनिक पेपर्स' या अभिजात कलाकृतीने जी उंची गाठली तीच उंची ओरिया साहित्यात 'छमन अठगुण्ठा'ने गाठली होती. डिकन्सच्या त्या कलाकृतीप्रमाणेच या कादंबरीनेही वाचकांना पोट धरधरून हसवले. त्यांच्या (वाचकांच्या) आयुष्यातल्या या विसंगती यापूर्वी कुणीही इतक्या बारकाईने टिपल्या नव्हत्या अन् त्या इतक्या भेदक विनोदी पद्धतीने तर कुणीच त्यांच्यासमोर मांडल्या नव्हत्या. या कादंबरीतली पात्रे वाचकांना इतकी खरी, इतकी आपली वाटायला लागली होती की ज्या वेळी कादंबरीतील सारियाचा मृत्यू अन् चंपाच्या खुनाच्या खटल्याचा प्रसंग 'उत्कल साहित्य'मध्ये छापून येऊ लागला तेव्हा दूरदूरहून लोक कटकला येऊ लागले. मंगराजाला आरोपीच्या पिंजऱ्यात उभा राहिलेला पाहण्यासाठी कोर्टात गर्दी करू लागले. आजवर कुठल्यातरी काल्पनिक कलाकृतीने जनमानसावर असा परिणाम घडवून आणलेला दिसतो का?

***

# 12

# नवलाईची आधुनिकता

फकीरमोहनांची 'प्रायश्चित्त' ही कादंबरी मात्र 'छमन अठगुण्ठा'तील ग्रामीण वातावरणाच्या अगदी विरुद्ध अशा कटक शहरातल्या नाटकमंडळीच्या पार्श्वभूमीवर साकारलेली दिसते. त्यातली मुख्य पात्रे ही एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या पर्वातली उच्चवर्गीय पदवीधर तरुण–तरुणी आहेत. ओरिसामधल्या दोन-तीन तरुण पिढ्या तोपर्यंत युनिव्हर्सिटीमधून मिळणाऱ्या पाश्चात्त्य पद्धतीच्या शिक्षणाने शहाण्या झाल्या होत्या. पाश्चात्त्य विचारांच्या अर्धवट पचवलेल्या तुकड्यांवर उच्चशिक्षित झाल्याचा तोरा मिरविणाऱ्या या उथळ, तथाकथित सुशिक्षितांच्या तुलनेत आपण 'अगदीच निरक्षर, निर्बुद्ध आहेत' असे फकीरमोहन थट्टेने कबूल करीत असत. पालकांनी आणि जातीजमातींनी घातलेले निर्बंध झुगारण्याकडे हळूहळू या नवशिक्षित तरुणांचा कल वाढू लागला असल्याचे फकीरमोहनांच्या चाणाक्ष नजरेतून सुटले नव्हते, अन् त्यामुळे या तरुणांच्या पदरी कोणते दु:ख येऊ शकते याची चाहूलही त्यांना लागली होती. या तरुणांच्या आधीच्या म्हणजे त्यांच्या आईवडिलांच्या पिढीने आपल्या पूर्वजांच्या सगळ्या रूढी अन् परंपरांना आंधळेपणाने चिकटून राहून जे दु:ख भोगले होते, तसेच दु:ख आता दुसऱ्या टोकाला ही नवी पिढी भोगणार ही अटकळ फकीरमोहनांनी बांधली होती. दोन्ही पिढ्यांनी संतुलन साधले नव्हते अन् या कृत्याबद्दल दोघांनाही घोर 'प्रायश्चित्त' घ्यावे लागणार आहे असा त्यांच्या 'प्रायश्चित्त' या कादंबरीचा सूर आहे. तिचे कथानक साधारणपणे असे आहे –

कटक शहरातला शंकरसेन नावाचा एक माणूस श्रीमंत बनतो. मोठी इस्टेट खरेदी करून तो स्वत:ला 'राजा' म्हणवून घेऊ लागतो. पण आपण मुळात कोण आहोत अन् श्रीमंत होण्यासाठी आपण काय काय केले आहे याची बोचणी त्याच्या मनाला कायम लागून राहिली असते. त्याच्या इस्टेटीजवळच भैसनाब पटनाईक नावाच्या एका गर्भश्रीमंत माणसाची इस्टेट असते. या पटनाईकांना हा शंकरसेन मुळीच आवडत नसतो. शंकरसेनाच्या मनात मात्र 'पटनाईकांच्या बरोबरीचे स्थान मिळवणे' हीच एकमेव इच्छा असते. पटनाईकदेखील त्याची ही इच्छा चांगली ओळखून असतात.



पटनाईक स्वत: इंग्रजी शिकलेले नसले तरी काळाची पावले ओळखून त्यांनी आपला एकुलता एक मुलगा गोविंदचंद्र याला इंग्रजी शिक्षणासाठी कटकला पाठविलेले असते. हा गोविंदचंद्र चांगला उंचपुरा, रुबाबदार अन् बऱ्यापैकी बुद्धिमानही असतो. कॉलेजात प्रवेश घेतल्यानंतर काही दिवसांत आपल्या मित्रमंडळीत तो उदयोन्मुख कवी म्हणून ओळखला जाऊ लागला असतो. हळूहळू तो आपल्या कुटुंबाचेच नाही तर संपूर्ण ओरिया लोकांचे आशास्थान बनतो. गोविंदचंद्र आणि त्याचे तरुण महाविद्यालयीन सहकारी समाजसुधारणांसारख्या राष्ट्रीय प्रश्नातही रस घेत असत. त्यासाठी त्यांनी 'आलोचना सभा'सारख्या क्लबची स्थापना केलेली असते. या क्लबद्वारे ते वेळोवेळी परिसंवाद, चर्चा घडवून आणत असतात. तरुण, देखणा अन् गर्भश्रीमंत असलेला गोविंदचंद्र अर्थातच या सर्वांचा नेता म्हणून चमकत असतो.

अशाच एका सभेमध्ये गोविंदचंद्राची भेट शंकरसेन मोहन्तीच्या राजीवलोचन नावाच्या पुतण्याशी होते. हाही आपल्या काकासारखाच नवश्रीमंत अन् सामाजिक प्रतिष्ठेला हपापलेला तरुण असतो. या शंकरसेन मोहन्तीला इंदुमती नावाची एक तरुण, सुंदर आणि उपवर कन्या असते. तिचे आणि गोविंदचंद्राचे लग्न त्यांच्या पालकांच्या संमतीशिवाय जुळवून आणायचे अन् शंकरसेनाची मर्जी संपादन करायची असे राजीवलोचन ठरवतो. कविमनाच्या गोविंदाचंद्राच्या मनातल्या प्रणयभावना जागा करण्यासाठी आपली चुलतबहीण इंदुमती ही नुसती सुंदर नाही तर ती उत्तम कवयित्रीही आहे हे तो गोविंदाचंद्राच्या मनामध्ये ठसवतो.

## डार्विनचा सिद्धान्त

फकीरमोहनांनी आपल्या आयुष्यात इंग्रजी शिक्षणाच्या वरवरच्या प्रभावाने दिपून गेलेले लोक जसे पाहिले होते तसेच आपल्या मनातल्या गोष्टी साध्य करण्यासाठी काहीही करायला तयार असलेल्या अनेक व्यक्ती त्यांनी शहरातून पाहिल्या होत्या. भारतात त्या काळी नव्याने उदयाला आलेल्या या विचारधारेचे प्रतिनिधित्व करणारे कमललोचन नावाचे पात्र फकीरमोहनांनी आपल्या या 'प्रायश्चित्त'मध्ये रंगवले आहे. या कमललोचनाला राजीवलोचन आपल्या हाताशी धरतो. काही पैसे देऊन त्याच्याकडून 'डार्विनच्या नैसर्गिक निवडीच्या सिद्धान्तावर' एक पेपर तो लिहून घेतो. 'आलोचना सभे'च्या एका बैठकीत राजीवलोचन हा पेपर आपला स्वत:चा म्हणून वाचतो. अध्यक्षस्थानी गोविंदचंद्र असतो. साऱ्या जगाला हादरवून सोडणाऱ्या डार्विनच्या 'ओरिजीन ऑफ स्पीसीज' नावाच्या ग्रंथावर आधारित असलेला हा पेपर चर्चेला तोंड फोडतो. चर्चेची एकच धुमश्चक्री उडते अन् सभा एकमताने एक ठराव पारित करते, तो असा – 'प्रत्येक तरुणाला जातीपातीचा विचार न करता आपल्या मनासारखा साथीदार निवडण्याचा अधिकार आहे.'

या चर्चेचा अन् विशेषत: ठरावाचा गोविंदचंद्राच्या मनावर गहिरा परिणाम होतो. त्याच वेळी राजीवलोचन संधी मिळताच पुन:पुन्हा त्याच्यासमोर इंदुमतीच्या सौंदर्याचे, तिच्या दुर्मिळ अशा सौंदर्यासक्त वृत्तीचे वर्णन करत असतो. त्यामुळे गोविंदचंद्राची गत 'आधीच मर्कट तशातही मद्य प्याला' अशी होते. आपल्या प्रेमळ अन् म्हाताऱ्या आईवडिलांच्या सगळ्या आशाआकांक्षांचा आपण चक्काचूर करत आहोत हे समजून-उमजूनसुद्धा तो आपल्यापेक्षा कमी दर्जाच्या जातीच्या इंदुमतीशी लग्न करायचे ठरवतो. या गुपचूप लग्नाची गोष्ट जेव्हा पटनाईकांना समजते तेव्हा त्या वृद्धाची सगळी सरंजामी इज्जत फक्त उद्ध्वस्तच होत नाही तर त्यांच्या कौटुंबिक जीवनाचा सगळा पायाच उद्ध्वस्त होतो.

गोविंदचंद्र आणि त्याचे आईवडील एकमेकांना भेटू नयेत याची सर्व काळजी राजीवलोचन पुढे घेत राहतो. पण एकदा गोविंदचंद्राला बातमी समजते की, त्याची आई अंथरुणाला खिळली असून मरण्यापूर्वी फक्त एकदा आपल्या मुलाचे तोंड पाहण्याची तिची इच्छा आहे. आता मात्र गोविंदचंद्राला राहावत नाही अन् तो तडक गावी जायला निघतो. राजीवलोचन तत्परतेने त्याचा हा बेत हाणून पाडायला सरसावतो. तो घाईघाईने आपल्या काकांची म्हणजे शंकरसेनची भेट घेतो. त्यांच्या मुलीच्या-इंदुमतीच्या भवितव्याच्या दृष्टीने गोविंदचंद्राने त्याच्या आईबापांना भेटणे कसे धोक्याचे आहे हे तो त्यांना व्यवस्थित समजावतो. इंदुमतीची भेट घेऊन तिच्यापुढे एक 'कविता' ठेवतो अन् तिच्यावर ती कविता स्वत:ची आहे अशी सही गरीब भाबड्या इंदुमतीला करायला लावतो. 'आपल्या पतीने त्वरित आपल्याला येऊन भेटावे' अशी भावना अत्यंत आर्तपणे व्यक्त करणारी ती कविता असते. तिची भाषाही अतिशय हळवी, रोमँटिक असते. तरुण रोमँटिक गोविंदचंद्राला कवितेतली भावनांची वादळे घेरून टाकतात. त्या प्रवाहात तो अलगद सापडतो, वाहवत जातो अन् आईला भेटण्याचा बेत पुढे ढकलून इंदुमतीच्या ओढीने तिच्याकडे धाव घेतो. तो सासुरवाडीला जायला निघतो.

ते दिवस पावसाळ्याचे असतात. रात्रीची वेळ असते. मधल्या काळात त्या गावात अनेक दरोडे पडलेले असतात. एक दरोडा तर सासरेबुवांच्या घराच्या जवळच्या घरावरच पडलेला असतो. गोविंदचंद्राला या कशाचीच कल्पना नसते. आपल्याला पाहून इंदुमती कशी चकित होईल असे प्रणयी विचार मनात घोळवत तो सासुरवाडीच्या घरी पोहोचतो. इंदुमतीची खोली नदीच्या बाजूची आहे हे त्याला माहिती असते. कुठल्याही संकेतांची पर्वा न करता तो नदीकाठच्या फुटपाथवजा भागावरून हलकेच इंदुमतीच्या खोलीच्या खिडकीपाशी जातो. त्या वेळी मध्यरात्र उलटून गेलेली असते. अशा वेळी खिडकीवर बसणाऱ्या थापा ऐकून इंदुमतीच्या खोलीत झोपलेली तिची दासी जोरजोरात किंचाळू लागते. घरातल्या सगळ्या



लहानमोठ्या स्त्रियाही काय झाले हे न कळताच त्या किंचाळण्यात सामील होतात. बिचारा जावई चोर समजला जातो. मोहन्तीचे नोकरचाकर नदीच्या बाजूला धावतात अन् अंधारातच त्याला बुकलून काढतात. मग त्याची मोट वळून त्याला एका खोलीत फेकून देतात.

दुसऱ्या दिवशी सकाळी सगळा लाजिरवाणा प्रकार उघडकीला येतो. गोविंदचंद्राला उपचारांसाठी कटकला सरकारी इस्पितळात दाखल केले जाते. तिथेच आईच्या मृत्यूची वार्ता त्याच्या कानी पडते. आपल्या नवऱ्याची झालेली मानहानी पाहून इंदुमती मनोमनी इतकी शरमते अन् दु:खी होते की त्या दु:खाच्या भारात ती घरामागील नदीत उडी घेऊन जीव देते. थोरले पटनाईक (गोविंदचंद्रांचे वडील) आपल्या इज्जतीला बसलेला हा धक्का सहन न झाल्याने घर सोडून निघून जातात. गोविंदचंद्राचे सासरे म्हणजे आपले थोरले मोहन्ती आपण प्रतिष्ठा प्राप्त करण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचे झालेले हे हिडीस परिणाम पाहून विरक्त होतात अणि तेही संन्यास घेण्यासाठी घराबाहेर पडतात. तरुण गोविंदचंद्र बरा होताच संन्यास घेण्याच्या उद्देशाने बाहेर पडतो.

संन्याशाच्या वस्त्रात असलेल्या या सगळ्यांची भेट मथुरेला होतो. आयुष्यात केलेल्या पापांचा प्रत्येकाला पश्चात्ताप झालेला असतो. समाजात पूर्वी वेगवेगळ्या प्रतिष्ठा पातळीवर वावरणारे पटनाईक आणि मोहन्ती आता संन्यासी म्हणून एकमेकांचे सखे, ईश्वराचे सेवेकरी अशा एकाच पातळीवर आले असतात. ते दोघे आग्रह करून गोविंदचंद्राला घरी पाठवतात. स्वत: मात्र मथुरेलाच राहायचे ठरवतात. गोविंदचंद्र घरी परततो. दोन्ही इस्टेटी नीट सांभाळतो. लोकहिताची कामे करण्यात सगळ्या संपत्तीचा विनियोग करतो. पुन्हा लग्न मात्र करत नाही. तरुणपणी आपल्या हातून घडलेल्या पापाचे जणू तो दीर्घ प्रायश्चित्त घेतो. 'प्रायश्चित्त'ची कथा इथे संपते. ही शेवटची कादंबरी फकीरमोहनांच्या उतारवयात म्हणजे त्यांच्या मृत्यूच्या तीन वर्षं आधी प्रकाशित झाली होती.

कुठलेही औपचारिक शिक्षण न झालेले फकीरमोहन आपल्या भोवतालच्या जगात घडणाऱ्या अगदी नवीनतम अशा राजकीय, वैज्ञानिक घटनांची नोंद किती डोळसपणाने घेत असत हे पाहिले की आपण चकित होतो. जातिभेद विसरून भारतीय तरुणांनी आपल्या जीवनसाथीदारांची निवड करावी असा संदेश देणारा पेपर कमललोचन वाचतो. त्याच्या पुष्ट्यर्थ तो डार्विनचा सिद्धान्त वापरतो. प्रायश्चित्त' कादंबरीतील हा अगदी गाभ्याचा प्रसंग आहे, तो तिचा मर्मबिंदू आहे, असे म्हणायला हरकत नाही. युनिव्हर्सिटीतल्या मुलांनी अशा तऱ्हेचे पाऊल उचलण्याचा प्रसंग तत्पूर्वी कुणी आपल्या कल्पनेतही रंगवला नव्हता. डार्विनच्या 'नॅचरल सिलेक्शन थियरी'चा उपयोग फकीरमोहनांनी आपल्या या कलाकृतीमध्ये अतिशय चपखलपणे केला आहे. त्यांच्या या कौशल्याला मनापासून दाद द्यावीशी वाटते.

**रासवटपणाकडून उदात्ततेकडे**

याच कादंबरीत नाही तर इतर अनेक कथा-कादंबऱ्यांमध्येही वाचकांचे मन रासवटपणाकडून उदात्ततेकडे नेण्याचा प्रयत्न फकीरमोहनांनी केलेला दिसतो. त्यासाठी ते विचारांची खोली आणि उंची गाठतात, पण या सर्व वेळी त्यांचे पाय मात्र वास्तवात घट्टपणे रोवलेले असतात. उदाहरणादाखल त्यांच्या 'प्रायश्चित्त' कादंबरीतील एक प्रसंग घेऊ. कटकमधल्या हॉस्पिटलमध्ये जखमी अवस्थेतील गोविंदचंद्र उपचार घेत असतो. त्याच्या शेजारच्या वॉर्डमधला एक पेशंट मरतो. गोविंदचंद्राला डॉक्टर जेव्हा तपासायला येतो तेव्हा गोविंदचंद्र त्याच्याशी जीवन, जीवनातल्या मूलभूत समस्या, मृत्यू, आत्मा अशा विषयांवर बोलतो. त्यातून आपले तदनुषंगिक विचार तो प्रकट करतो. किंवा फकीरमोहनांचीच दुसरी एक 'मामु' नावाची कादंबरी आहे. तिच्यातील तरुण नायकाचा अकाली मृत्यू झालेला असतो. मृत्यूनंतर अकराव्या दिवशी 'शुद्धतेसाठी' सगळ्यांनी एकत्र जमण्याची पारंपरिक प्रथा ओरिसामध्ये आहे. हुशार लेखक या प्रसंगी प्रसिद्ध पंडितांना बोलावतो. तरुण नायकाच्या मृत्यूच्या भीषण पार्श्वभूमीवर घेण्यात येणाऱ्या या सभेतील चर्चेचा वाचकांच्या मनावर अपेक्षित परिणाम होतो. दोन्ही प्रसंगांची, विचारांची तीव्रता एकमेकांमुळे मनावर ठसते. हिऱ्यामुळे जशी सोन्याला झळाळी प्राप्त होते किंवा सोन्याच्या कोंदणात जसा हिरा अधिक शोभून दिसतो तशी या दोन प्रसंगांची फकीरमोहनांनी केलेली रचना एकमेकांमुळे शोभून दिसते. नाटकमंडळीत काम करणारी छोटी छोटी नटमंडळी, त्यांचे आपापसातले क्षुद्र हेवेदावे अन् पंडितांकडून होणारी 'देव', 'आत्मा', त्याचे स्वरूप आणि अस्तित्व यांच्याविषयीची चर्चा, हे विरोधाभासाने अधिक उठून दिसतात. पण इथेही फकीरमोहनांचा मूळ मिस्कील स्वभाव लपून राहत नाही. इतक्या आध्यात्मिक, उदात्त वातावरणात चर्चा चालू असताना पंडितांपैकी एका रंगा भट्टलू वेंकट पंतलू नावाच्या तेलुगू पंडिताच्या तोंडी ते एक संस्कृत श्लोक घालतात. त्याचा अर्थ असतो –

"वेद आणि दर्शन तर मला प्राप्त व्हावीतच पण हे देवा, या जन्मी आणि पुढच्या आणि त्या पुढच्या सर्व जन्मी मला तिखट, चिंच आणि ताक यांनी समृद्ध आयुष्यही प्राप्त व्हावं!"

फकीरमोहनांच्या साहित्यकृतींचे दुसरे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या चांगल्या आणि वाईट अशा दोन्ही प्रकारच्या पात्रांना दुःखाला सामोरे जावे लागते. वास्तव जीवनात जसे प्रत्येकाच्याच वाट्याला काहीना काही दुःख येते तसेच ते त्यांच्या कलाकृतीतील पात्रांच्या वाट्याला येते, मग ती चांगली पात्रे असोत की वाईट! फक्त त्यांची चांगल्या प्रवृत्तीची पात्रे दुःखातून अधिक झळाळी घेऊन बाहेर पडतात तर वाईट प्रवृत्तीची पात्रे तावूनसुलाखून, शुद्ध होऊन बाहेर पडतात. फकीरमोहन नैतिकतेवर कुठल्याही प्रकारची टीकाटिप्पणी किंवा भाषणबाजी मात्र करत नाहीत. कारण त्यांच्या



दृष्टीने पाप म्हणजे केवळ 'चुकीच्या मार्गाने जोडले जाणारे हितसंबंध (maladjustment) असतात. फकीरमोहनांच्या लेखनामागचा मूळ उद्देश जे जे पुरातन, सडलेले, घातक आणि विचारांना न पटणारे आहे ते नष्ट करणे हाच जरी असला तरी अनैतिकतेचा पुरस्कार मात्र ते कधीच कुठल्याही स्वरूपात करत नाहीत. म्हणूनच त्यांच्या कथाकादंबऱ्यांमधल्या तथाकथित 'पापी' व्यक्ती पश्चात्तापाच्या अग्नीमध्ये जळून शेवटी मनाची शुद्धता प्राप्त करताना आपल्याला दिसतात. 'खऱ्या पश्चात्तापाने माणूस पापापासून मुक्त होतो' ही त्यामागची त्यांची मूळ धारणा असते.

फकीरमोहनांच्या साहित्यात विचारांचा एकजिनसीपणा, उदात्तता, प्रेरकता आणि जोडीला मनोरंजन असा अनोखा मेळ झालेला दिसतो. ओरिया समाजजीवनाच्या प्रतिबिंबित रूपातून हा मेळ ते आपल्यासमोर साकार करतात. वास्तवता आणि आदर्शवाद यांचे इतके अभिन्नत्व फकीरमोहनांशिवाय क्वचितच दुसऱ्या एखाद्या कलाकृतीतून आपल्याला पाहायला मिळते. कुठलातरी उद्देश मनात ठेवून किंवा कादंबरीकार म्हणून लौकिक मिळवावा हा हेतू मनी धरून फकीरमोहनांनी कधीच कादंबरीलेखन केलेले नव्हते, तर अगदी प्रसंगोपात्त, कुणाच्या तरी आग्रहाखातर त्यांनी कादंबरीलेखन केले होते, ही गोष्ट लक्षात घेतली तर त्यांच्या रचनाकौशल्याला मनापासून दाद द्यावीशी वाटते.

'छमन अठगुन्ठा', 'मामू' आणि 'प्रायश्चित्त' या फकीरमोहनांच्या सामाजिक कादंबऱ्या आहेत तर 'लछम्मा' ही त्यांची एकमेव ऐतिहासिक कादंबरी आहे. वस्तुनिष्ठतेचे त्यांना असलेले भान या कादंबरीमधून लखलखीतपणे आपल्यासमोर प्रकट होते.

***

# 13

# खरा भारतीय बहर

'छमन अठगुन्ठा'सारखीच 'लछम्मा' ही कादंबरीदेखील 1901 ते 1903 या कालखंडात 'उत्कल साहित्य'मधून क्रमश: प्रसिद्ध झाली होती. ब्रिटिशांनी ओरिसा काबीज करण्याच्या घटनेला याच वर्षी शंभर वर्षे पूर्ण झाली होती. त्या निमित्ताने जगातल्या सर्व भागांतून वस्तीला असलेल्या ओरिया भाषिक लोकांचे एक संमेलन कटक इथे भरले होते. 'कुठल्यातरी एका नियंत्रणाखाली, झेंड्याखाली सर्वांनी एकत्र यावे' या मागणीसाठी मुख्यत: हे संमेलन आयोजित करण्यात आले होते. अशा राष्ट्रीय भावनेने भारलेल्या वातावरणात जरी 'लछम्मा' लिहिली गेली असली तरी तिच्या लेखनात कुठल्याही प्रकारचा कर्कशपणा फकीरमोहनांनी येऊ दिला नाही किंवा कुठल्याही रक्तपिपासू प्रवृत्तीचा पुरस्कारही त्यांनी केलेला नाही.

'लछम्मा'चा लेखक स्वत: हिंदू असला तरी त्याने या कादंबरीच्या शेवटी शोषक असणाऱ्या 'हिंदू बारगिरां'वर मुस्लिम नवाब अलीवर्दी खानाचा विजय झालेला दाखवला आहे. कारण सृजनशील फकीरमोहन आपल्या पात्रांकडे 'हिंदू' किंवा 'मुस्लीम' जातीची पात्रे म्हणून पाहत नाहीत तर केवळ 'पात्रे' म्हणून तटस्थपणे त्यांच्याकडे पाहतात. म्हणूनच त्यांच्या कादंबरीतील संघर्ष हा हिंदू आणि मुसलमानांमधला संघर्ष म्हणून कधीच येत नाही; तो पात्रांच्या प्रवृत्तींमधला संघर्ष म्हणून येतो. स्वत: हिंदू असूनही ज्या सहानुभावाने फकीरमोहनांनी मुस्लीम समाजाच्या व्यथा रंगवल्या आहेत तो सहानुभाव वाखाणण्याजोगा आहे. दुसरीकडे त्यांनी हिंदू आणि मुस्लीम या दोघांनाही त्यांच्या चुकांबद्दल शिक्षा झालेल्या दाखवल्या आहेत. त्याही त्यांनी 'ते अखेरीस भारतीय आहेत' या भावनेने, त्यांच्या भल्यासाठीच केलेल्या आहेत, याबद्दल कुणाचेही दुमत नसावे.

हे सगळे लक्षात घेतले तर – " 'लछम्मा' ही तोपर्यंतच्या आधुनिक भारतीय साहित्यातल्या **मोजक्याच अशा खऱ्या** 'भारतीय' कादंबऱ्यांपैकी एक कादंबरी आहे," हे **स्वत: लेखकाचे मत मान्य करावे** लागते. आजच्या बुद्धिवंतांना आणि लेखकाने आपल्या **स्वत:च्या आणि इतरांच्या साहित्याचे तटस्थपणाने** अन् वस्तुनिष्ठपणाने विश्लेषण **करून पाहिले तर त्यांच्या असे लक्षात येईल की, आजच्या साहित्यातले**



बोटावर मोजण्याइतके साहित्यच खऱ्या अर्थाने 'भारतीय' साहित्य आहे. 'कालिदास' किंवा 'वाल्मीकी' ज्या अर्थाने 'भारतीय लेखक' होते त्या अर्थाने भारतीय असलेल्या लेखकांची संख्या तर फारच कमी आहे. आपण सर्व आपापल्या परीने उत्तम बंगाली, तेलुगू किंवा महाराष्ट्रीय आहोत, पण 'भारतीय' म्हणवून घ्यायला जो एक द्रष्टेपणा, जिजीविषा आणि क्षमता लागते ती आमच्यामध्ये अभावानेच आढळून येते. त्या दृष्टीने पाहिले तर बंकिमचंद्र आणि थोड्या प्रमाणात रवींद्रनाथ हेही बंगाली किंवा फार फार तर 'हिंदू' असल्याचे दिसून येते. याच दृष्टिकोनातून सत्तर वर्षांपूर्वी लिहिल्या गेलेल्या 'लछम्मा'कडे पाहिले तर ती मात्र आधुनिक भारतीय साहित्यातील 'भारतीय' साहित्याचा नमुना ठरते.

'लछम्मा'चे कथानक साधारणपणे असे आहे –

अठराव्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकातली ही गोष्ट आहे. एका गावातली काही स्त्री–पुरुष मंडळी जगन्नाथाच्या यात्रेला निघालेली असतात. तो अंदाधुंदीचा काळ असल्याने, वाटमारीचे प्रकार सतत घडत असतात. त्यामुळे ही मंडळी घोड्यांवर बसून अन् जवळ शस्त्रास्त्रे बाळगून प्रवास करत असतात. प्रवास करता करता ते बंगाल आणि ओरिसाच्या उत्तरपूर्व दिशेला असलेल्या भागात येऊन पोहोचतात.

बंगाल आणि ओरिसामधली सीमा ते पार करतात न करतात तोच त्यांच्यावर 'मराठा' घोडेस्वार हल्ला करतात. त्यांचा सगळा पैसाअडका लुटला जातो. यात्रा इतस्तत: विखरून जाते. रात्रीच्या गडद अंधारात कोण कुठे आहे, कुणाचे काय झाले आहे, याचा कुणालाच पत्ता लागत नाही.

हा प्रकार जिथे घडतो तिथून अगदी थोड्याच अंतरावर 'रायबान'चा किल्ला असतो. बालासोर जिल्ह्याच्या जालेश्वर गावाजवळच्या जंगलात या किल्ल्याचे भग्नावशेष आपल्याला आजही पाहायला मिळतात. त्या वेळी हा किल्ला सामन्तराय राघवरतसिंग बैरीगंजन मंधाना नावाच्या खंदायत प्रमुखाच्या ताब्यात असतो. या बलाढ्य राजाशी आपला संबंध जुळून यावा यासाठी हिंदू आणि मुस्लीम दोघेही सारख्याच प्रमाणात उत्सुक असतात. अंदाधुंदीच्या अन् लुटालुटीच्या त्या काळातही आपल्या माणुसकीच्या आणि सभ्यपणाच्या वागणुकीमुळे तेथील राजाराणी हे प्रजेचे अत्यंत आवडते दैवत असतात. रायबानच्या शूर पाईकांच्या मदतीने अलीवर्दीने आपल्या सुबनरेखा नदीच्या किनाऱ्यावरील प्रांतातून पेंढारी भास्कर पंडिताच्या बार्गींचा पूर्णपणे नायनाट केलेला असतो.

एक दिवस रायबानच्या राघवरतसिंगाच्या दरबारात त्याचे शिपाई एका अर्धखेडूत तरुण स्त्रीला पकडून राजासमोर हजर करतात. ती इतकी घाबरलेली आणि गोंधळलेली असते की कुठल्याच प्रश्नाचे धड उत्तरही ती देऊ शकत नाही. त्यामुळे राघवरतसिंग तिला अंतर्गृहात राणीमातेकडे पाठवून देतो. राणी हळुवारपणे तिच्याकडून सगळी

हकिकत काढून घेते. ती तरुणी 'लछम्मा' नावाची बार्गीच्या हल्ल्यातून वाचलेली यात्रेकरू असल्याचे त्यांना समजते. 'संकटं ही सौंदर्य आणि सद्गुण यांच्या पाचवीला पुजलेली असतात' असे म्हणतात, ते किती खरे असते याचा प्रत्यय लछम्मालाा लवकरच येतो. राणीच्या प्रेमळ संरक्षणाखाली लछम्मा निर्धास्तपणे विसावू पाहते न पाहते तोच मराठ्यांचे प्रतिनिधी पंडित शिवशंकर मालविरा हे खंदायत प्रमुखाला भेटून अलीवर्दीच्या विरुद्ध नागपूरकर भोसल्याशी तह करण्याचे प्रयत्न सुरू करतात.

मराठा शिवशंकर मालविरा आणि रायबानच्या बैरीगंजन मंधाता दरबाराचे प्रतिनिधी असलेले फर्डे ब्राह्मण वक्ते वनमाळी वाचस्पती या दोघांमध्ये बोलणी सुरू होतात. एक संपूर्ण प्रकरणभर फकीरमोहनांनी या दोघांमधली शाब्दिक जुगलबंदी रंगवली आहे. तिच्यातील वाचस्पतींचे वक्तृत्व वाचताना शिवाजी महाराजांचे वकील असलेल्या हनमंते यांच्या विद्वत्तापूर्ण वक्तृत्वाची आपल्याला सहजी आठवण येते. जगन्नाथाच्या यात्रेला निघालेल्या असहाय यात्रेकरूंवर मराठी बार्गींनी केलेला निर्घृण हल्ला, या हल्ल्यामधून सुदैवाने वाचलेली अन् किल्ल्यात आश्रयाला राहिलेली दुर्दैवी लछम्मा यांच्या आठवणी वाचस्पतींच्या मनात अगदी ताज्या असतात. हिंदूंनी आपल्याच जातभाईंवर हल्ला केल्याचे धडधडीत उदाहरण समोर असल्याने शिवशंकरांचे 'मुस्लिमांच्या विरोधात' हिंदू म्हणून एक होण्याचे आवाहन वाचस्पती सपशेल धुडकावून लावतात. सामान्य जनतेला फक्त चांगले शासन, सुरक्षित जीवन हवे असते. ते त्यांना मिळत असताना धर्मविद्वेषाची भावना त्यांच्यामध्ये निर्माण करणे कसे अतार्किक आहे हे वाचस्पती पटवून देतात. उलटपक्षी स्वत:ला हिंदूंचे बांधव म्हणवणाऱ्या मराठा पेंढाऱ्यांनी ओरिसाच्या एका मोठ्या ग्रामीण भागात कसे दहशतीचे वातावरण निर्माण केले आहे हे लक्षात घेता 'हे केवळ आपल्या हिंदू बांधवांनी केलेले कृत्य आहे म्हणून त्याला क्षमा करावी' – असे मुळीच नसल्याचे ते शिवशंकरांना ठामपणे सांगतात. वाचस्पती नुकतेच कलकत्त्याला गेले असताना त्यांची नवद्वीप इथे एका मिशनरी पाद्र्याची भेट झालेली असते. त्या भेटीची हकिकत ते शिवशंकरांना सांगतात. ते म्हणतात – ''त्या मिशनऱ्याचा माणुसकीवरचा गाढ विश्वास आणि देवावरची अतूट श्रद्धा पाहून, सातासमुद्रापलीकडून आलेली ही गोरी जमात हिंदू आणि मुस्लीम दोघांनाही नक्कीच नैतिकतेमध्ये मागे टाकेल आणि आम्ही मात्र आपापसात किंवा आपल्याच लोकांविरुद्ध लढत राहून एक दिवस नामशेष होऊन जाऊ.''

मराठ्यांचे वकील रिकाम्या हाताने पण अपमानाने जळणाऱ्या मनाने परत जातात. बदल्याची आग त्यांच्या मनात धुमसत असते. खंदायतप्रमुखाला राजकीय धडा शिकविण्याचा निर्धार करून नागपूरहून मोठे लष्कर लवकरच चाल करून येते. शक्तिशाली भोसल्यांनी पुढे केलेला मैत्रीचा हात संकुचित वृत्तीने धुडकावून लावल्याबद्दल त्यांना शिक्षा द्यायची असते. रायबानवर हे आक्रमण जेव्हा होते तेव्हा दुर्दैवाने त्यांचे



बहुतेक सैन्य दूर बंगालच्या एका भागात अलीवर्दींच्या मदतीला गेलेले असते. त्यामुळे रायबानची दुबळी संरक्षणव्यवस्था ताब्यात घ्यायला मराठा सैन्याला फार काळ लागत नाही.

खंदायतप्रमुख आणि वनमाळी वाचस्पती पकडले जातात. खंदायतप्रमुख मोठ्या शौर्याने मरणाला कवटाळतो. आपल्या ब्राह्मणी बुद्धीच्या जोरावर वनमाळी वाचस्पती मात्र स्वत:ची सुटका करून घेतो. राणीमाता नदीत जीव देते. जीव देण्यापूर्वी तिने लछम्माच्या पदराला काही सोन्याच्या मोहरा बांधून तिला मराठ्यांच्या तावडीतून दूर पाठवून दिले असते.

युद्धाचे पारडे पूर्णपणे मराठ्यांच्या बाजूला झुकलेले असते. अलीवर्दींचे सैन्य बंगालच्या मध्यापर्यंत म्हणजे कटवापर्यंत मागे ढकलले गेले असते. ही लढाईची धुमश्चक्री सतत तीन वर्षे चाललेली असते. दोन्हीकडचे सैनिक पार दमून, थकून गेलेले असतात. आता दोन्हीकडच्या वकिलांनी भेटून बोलणे, हाच एकमेव उपाय समोर दिसत असतो. दोन्ही बाजूंच्या लढाई क्षेत्राच्या मधोमध असलेल्या एका राजेशाही तंबूमध्ये ही वकिलांची भेट ठरते.

एका पानविक्याने या लढाईच्या दरम्यान सैन्यातील जवळपास प्रत्येकाशी मैत्री केली असते. सैन्याबरोबर तोही एका ठिकाणाहून दुसरीकडे जात असतो. इकडे अलीवर्दींच्या सैन्यात नव्याने भरती झालेला बादलसिंग हा सैनिक आपल्या गुणांनी सैन्यात हळूहळू बराच लोकप्रिय झालेला असतो. एका संकटप्रसंगी तर त्याने आपला जीव धोक्यात घालून खुद्द अलीवर्दींचा जीव वाचवला असतो. त्याचे बक्षीस म्हणून अलीवर्दी त्याची नेमणूक 'नवाबाचा शरीररक्षक' म्हणून करतो. एका हिंदू तरुणाला ही नेमणूक मिळाल्याने इतर मुस्लीम सेवाधिकारी मात्र काहीसे नाराज असतात.

ठरलेल्या दिवशी, ठरलेल्या वेळी भास्कर पंडित कटवा इथल्या त्या राजेशाही तंबूमध्ये प्रवेश करतो. नवाब अलीवर्दी जातीने पुढे होतो अन् त्यांचे स्वागत करून मैत्रीचे प्रतीक म्हणून त्यांना गळामिठी मारतो. ही राजकीय गळामिठी किंचित सैल करून दोघे थोडे अलग होतात न होतात तोच दोन व्यक्ती विजेच्या चपळाईने भास्कर पंडितावर हल्ला करतात अन् त्याला ठार करतात. हे दोघे दुसरेतिसरे कुणी नसून अलीवर्दींचा शरीररक्षक बादलसिंग आणि मराठा सैन्यातला पानविक्या असे दोघे असतात. बादलच्या एका इशाऱ्यासरशी दुसऱ्याच क्षणी नवाबाचे सुसज्ज सैनिक बेसावध मराठी सैन्यावर तुटून पडतात.

मूलत: चांगल्या प्रवृत्तीचा असल्याने नवाब या खुनाच्या प्रकाराने क्षणकाल स्तंभित होतो, पण नंतर मात्र आपल्याला झालेला आनंद लपवत तो बादलसिंगाची बंगालमधल्या बनाबिझपूर नामक परगण्याचा राजा म्हणून नेमणूक करतो. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे तरुण पानविक्या बक्षीस नाकारतो. 'या गुन्ह्यामधल्या

आपल्या साथीदाराने म्हणजेच बादलसिंगाने आपल्या बहिणीशी लग्न करावे' हेच बक्षीस आपल्याला हवे आहे, असे तो म्हणतो.

त्याहूनही धक्कादायक बाब म्हणजे बादलसिंग हे लाभदायक प्रलोभन क्षणार्धात धुडकावून लावतो.-तो म्हणतो की, त्याने आपल्या सुंदर, सद्‌गुणी पत्नीला एकनिष्ठ राहण्याचे वचन दिले आहे अन् ती जरी आता जिवंत नसली तरी तो आपण दिलेल्या वचनाला जागणार असतो, आपला शब्द पाळणार असतो.

दुसऱ्या दिवशी सकाळी नवाबासकट सगळ्यांच्या लक्षात एक धक्कादायक गोष्ट येते. तो पानविक्या आणि बादलसिंग हे दोघे रातोरात मुशिराबादहून नाहीसे झालेले असतात.

पुढे काही काळ लोटतो. एक दिवस गयेला फाल्गू नदीच्या काठावर वाळूत बसलेल्या दोन वृद्ध स्त्रियांच्या कानावर जवळूनच कुठूनतरी शब्द येतात – ''मी, लछम्मादेवी, धिअनकलसिंग शर्मांची मुली...'' जवळच काही धर्मकृत्य करणाऱ्या पंडिताच्या शेजारी बसलेल्या मुलीच्या तोंडून ते शब्द आले असतात. लगेच त्यांना एका तरुणाच्या तोंडून बाहेर पडलेले शब्दही ऐकू येतात – ''मी बादलसिंग, हरभजनसिंगांचा मुलगा...''

दोघी स्त्रिया त्या दोघांच्या दिशेने धावत सुटतात. त्यांच्या डोळ्यांमधून अश्रू ओघळत असतात. भिजलेल्या डोळ्यांनी, गदगदलेल्या स्वरात त्या पुन:पुन्हा पुटपुटत असतात – ''लछम्मा! तू! देवा! तुझी लीला, तुझी कृपा अगाध आहे!'' ''अरे मुला! माझ्या काळजाच्या तुकड्या बादलसिंग! तू! तूच आहेस ना?''

त्याचे असे झाले असते – धिअनकलसिंग आणि हरभजनसिंग हे दोघेही उत्तर प्रदेशातल्या रोहिलखंड भागात राहणारे राजपूत असतात. तरुणवयातच ते एका मुस्लीम मित्राच्या संगतीने वाहवत गेले असतात. त्यांच्या बायका अगदी कट्टर हिंदू असतात. त्यामुळे त्यांना नवऱ्यांचे वागणे मुळीच आवडत नसते. या दोघींची मुले, बादल आणि लछम्मा यांचे लग्न होते अन् या बायकांची मैत्री अधिकच दृढ होते. पुढे दोघीही जणी गोड गोड बोलून, समजावून सांगून आपापल्या नवऱ्यांना वाईट संगतीपासून, वाईट कामे करण्यापासून परावृत्त करतात. आपल्या पापांचे प्रायश्चित्त घेण्यासाठी आपण यात्रेला जायला हवे यासाठीही त्या आपल्या नवऱ्यांची मने वळवतात. त्या प्रमाणे ते सर्व जगन्नाथाच्या यात्रेला जात असताना हिंदू मराठा बार्गीनी गोडीखल या बंगाल आणि ओरिसाच्या सरहद्दीवरच्या गावात त्यांच्यावर हल्ला केला असतो. या हल्ल्यात दोघींचेही नवरे मारले जातात. इकडे गावाकडे हे लोक यात्रेला गेलेले पाहून त्यांचे मुस्लीम दोस्त रोहिलखंडमधली त्यांची संपत्ती–घरेदारे सगळे हडप करतात. हल्ल्यातून कसाबसा जीव वाचविलेल्या लछम्मा आणि बादलसिंग यांना जेव्हा हे सगळे कळते तेव्हा ते या वाताहतीला जबाबदार असणाऱ्या मराठ्यांना



धडा शिकविण्याची, त्यांचा सूड उगवण्याची प्रतिज्ञा करतात. रायबान किल्ला पडल्यावर राणीच्या मदतीने तिथून निसटलेली लछम्मा पानविक्याच्या पुरुषीवेशात मराठी सैन्यात प्रवेश करते. राणीने पदरात बांधून दिलेल्या सोन्याच्या मोहरा योग्य जागी पेरून ती सर्वांची मैत्री संपादन करते, अगदी आतल्या गोटात प्रवेश मिळविते. इकडे मराठ्यांच्या हल्ल्यात जखमी झालेला बादल हळूहळू बरा होतो आणि अलीवर्दीच्या सैन्यात भरती होतो. दोन वर्षांपूर्वी यात्रेमध्ये एकमेकांपासून दुरावलेली ही मंडळी एकमेकांना भेटण्यासाठी तळमळत असतात. आपण एकटेच त्या हल्ल्यातून वाचलेले दुर्दैवी आहोत असे समजत असतात. एक वेळ अशी येते की लछम्मा आणि तिची सासू एक संपूर्ण रात्र एकाच खेड्यात घालवतात, पण एकमेकींच्या अस्तित्वाची त्यांना कल्पनाही नसते. नियतीच्या या जीवघेण्या खेळाचे अतिशय उत्कृष्ट चित्रण फकीरमोहनांनी केलेले आहे. त्यामुळेच शेवटी येणारा या सर्वांच्या भेटीचा प्रसंग अधिक उत्कट, हृदयस्पर्शी झाला आहे.

शेवटी नवाब अलीवर्दी रायबानचा किल्ला लछम्माला बहाल करतात. लछम्मा आणि बादल आपले पुढचे आयुष्य राजा आणि राणी म्हणून सुखाने घालवतात. आपल्या माणुसकीच्या, चांगल्या वर्तनाने अन् दानशूरतेने ते चिरकाल लोकांच्या आठवणीत अमर होतात.

राजा बादल आणि राणी लछम्मा यांच्या मृत्यूनंतर मात्र काही काळातच बनबिष्णूपूरचे वैभवही मुर्शिदाबादप्रमाणे हळूहळू लयाला जाते. कादंबरीचा शेवट फकीरमोहन याच विषादपूर्ण भावनेने करतात. हे जग किती क्षणभंगूर आहे याची प्रकर्षाने जाणीव करून देणारा एक संस्कृत श्लोक ते शेवटी उद्धृत करतात. तो असा –

यादवराज सोडून गेल्यावर
ती पहिली द्वारका कुठे उरली?
रघुपती निघून गेल्यानंतर
उत्तर कौशलचं वैभव कुठे उरलं?
यावरून तरी बोध घे माणसा,
या जगात शाश्वत काहीही नसतं!

***

# 14

# पावसाळी सूर्यास्त

आपल्या आत्मचरित्राचा शेवट फकीरमोहन पुढीलप्रमाणे करतात –

"मी माझ्या अल्प शक्तीनुसार माझ्या भाषेच्या समृद्धीसाठी जे प्रयत्न केले, माझ्या देशाची सेवा करण्याचा जो प्रयत्न केला, त्याचे माझ्या देशबांधवांनी माझ्या जीवनाच्या या संध्याकाळी पुरेपूर कौतुक केले आहे. 1916 मध्ये बामरा राज्याने मला 'सरस्वती' पदवीने सन्मानित केले, 1917 मध्ये कटक इथे भरलेल्या ओरिया भाषिक शीतकालीन संमेलनाचे अध्यक्षस्थान देऊन मला गौरवण्यात आले. या सन्मानाने माझ्या सर्व आशाअपेक्षांची पूर्ती झाल्यासारखे मला वाटते. आता मला कशाचीही आकांक्षा नाही, अपेक्षा नाही. आपली रजा घेण्यापूर्वी मी माझ्या समस्त स्त्री–पुरुष वाचकांचे आणि देशबांधवांचे शतशः आभार मानतो; त्यांच्यापुढे नतमस्तक होतो."

वाचकांनी केलेला सन्मान स्वीकारून 14 जून 1918 ला फकीरमोहन आपल्या बालासोर येथल्या एकाकी घरी परतले. हा आदरसत्कार फकीरमोहनांच्या एकाकी पीडित अवस्थेत काही फार मोठा बदल घडवून आणू शकला नाही. त्यांचे दुर्बल शरीर सतत कुठल्याना कुठल्या व्याधींनी ग्रासलेले असायचे. आपल्या या शारीरिक वेदनांचे अन् एकलेपणाचे त्यांनी आपल्या आत्मचरित्रात वर्णन केले आहे. ते लिहितात –

"1915 सालच्या शेवटी शेवटी तत्कालीन बिहार आणि ओरिसा गव्हर्नमेंट कौंसिलचे सदस्य गोपबंधू दास पटणाहून परत येताना मुद्दाम बालासोरला उतरले. ओरिसाच्या या निःस्वार्थी सेवकाने आवर्जून माझी भेट घेतली, माझ्याबरोबर ते दोन दिवस राहिले. ज्या दिवशी ते इथून जायला निघाले, त्या दिवशी सकाळी ते माझ्या रुग्णशय्येपाशी काही काळ निःस्तब्धपणे उभे राहिले. त्यांच्या डोळ्यातून अविरत अश्रू ओघळत होते. काही वेळानंतर त्यांनी आपल्या भावनांवर कसाबसा ताबा मिळवला अन् गदगदलेल्या स्वरात हळुवारपणे मला म्हणाले, "माझ्या दोन दिवसांच्या या मुक्कामात मला तुमची परिस्थिती पूर्णपणे कळून चुकली आहे. तुम्ही फार अशक्त, असहाय्य आणि एकटे झाला आहात, केवळ नोकराचाकरांवर अवलंबून आहात. अशा वेळी तुमच्याजवळ तुमची काळजी घेणारे, तुमचे जवळचे असे आपले माणूस असणे जरुरीचे आहे."



फकीरमोहनांची शेवटची वर्षे जीवघेण्या आजारांशी झगडण्यात गेली. रक्तवाहिन्यांच्या आजाराने त्यांना दीर्घकाळ अंथरुणाला खिळवून ठेवले होते. सोबतीला फक्त जीवघेण्या वेदना होत्या. एकदा त्यांनी औषध समजून चुकून तीव्र सल्फ्युरिक ॲसिडचा डोस घेतला होता अन् मृत्यूच्या दाराशी जाऊन परत आले होते. अनेक महिन्यांच्या उपचारांनी त्यातून बरे होतात न होतात तोच कार्ब्यून्कल (Carbuncle) ने डोके वर काढले. पुन्हा त्यांना पुढचे काही महिने तीव्र वेदना अन् अस्वस्थपणात काढावे लागले.

## तीव्र जीवनेच्छा

पण याही परिस्थितीत फकीरमोहनांची जगण्याची उमेद, जीवनाविषयीची असोशी एखाद्या लहान मुलाइतकी तीव्र होती. देशाच्या प्रगतीविषयी सांगणारी बातमी असो की मानवी दुःख कमी करू शकणारा एखादा वैज्ञानिक शोध असो, मनाच्या आणि शरीराच्या इतक्या विकल अवस्थेत देखील ते या बातमीचे किंवा शोधाचे स्वागत अगदी मनापासून, उत्फुल्लपणे करत असत.

या शतकाच्या सुरुवातीच्या दशकात ओरिसातल्या युनिव्हर्सिटीमधून जे तरुण बाहेर पडले होते त्यांच्यातील काहींनी एकत्र येऊन पंडित गोपबंधू दास यांच्या आधिपत्याखाली एक अकादमी (Sylvan) स्थापन केली होती. तीर्थक्षेत्र पुरीपासून अकरा मैलांवर असलेल्या 'साक्षीगोपाल' नावाच्या खेड्यात ही अकादमी होती. आपल्या राष्ट्राच्या उद्धाराच्या भावनेने प्रेरित झालेले हे उच्चशिक्षित तरुण अगदी मामुली वेतनावर या ठिकाणी काम करत असत. पुढचे एक दशकभर ही अकादमी म्हणजे ओरिया संस्कृतीचे ज्वलंत केंद्रच बनली होती. ओरिया भाषिक लोकांच्या आशा-आकांक्षांचेही ती केंद्र बनली होती.

मृत्यूच्या केवळ एक वर्ष आधी फकीरमोहन इथे, या अकादमीच्या शाळेमध्ये तीन दिवस राहिलेले आपल्याला दिसतात. त्या वेळी त्यांचे वय पंचाहत्तर वर्षांचे होते, पण ते तिथे राहिले ते एखाद्या सामान्य विद्यार्थ्यासारखे! तेथील शिक्षक जरी त्यांना सन्मानाने, आदराने वागवत असले तरी फकीरमोहन मात्र इतर शंभर मुलांसारखेच वागत होते. ते इतर मुलांसोबत खेळत होते, पाठांतर स्पर्धेत भाग घेत होते, जमिनीवर बसून त्यांच्यासोबत जेवत होते, इतकेच नाही तर त्यांच्यासारखी आपली खरकटी ताटवाटी अतिशय उत्साहाने घासूनही आणत होते.

तीन दिवसांच्या या मुक्कामात तिथल्या शिक्षकांची जी समर्पित भावना, राष्ट्रप्रेम अन् मोकळे वातावरण फकीरमोहनांच्या अनुभवाला आले, त्याने ते अतिशय प्रसन्न झाले होते. एकदा शिक्षकांशी बोलताना ते गमतीने विचारते झाले, "तुम्हाला माहीत आहे की, मी एक अज्ञानी, अशिक्षित माणूस आहे. तुम्ही कृपा करून मला विद्यार्थी

म्हणून तुमच्या चरणांशी जागा द्याल का? अे, बी, सीपासून सुरू करून इंग्रजी शिकवाल का?''

यातला विनोद बाजूला ठेवू अन् या अकादमीतून परत जाताना त्यांनी व्यक्त केलेले विचार इथे पाहू. ते म्हणाले – ''स्वातंत्र्याचे जे रोपटे तुम्ही इथे लावले आहे त्याचा नक्कीच उद्या एक भरदार वृक्ष होईल, तो फुलाफळांनी डवरून उठेल. राष्ट्रकार्याचा दीर्घानुभव असलेला गोपबंधूंसारखा निःस्वार्थी कार्यकर्ता या कामात तुमच्या पाठीशी उभा आहे. त्यांनी तुम्हाला राष्ट्रीय उत्थानाच्या योग्य मार्गावर आणून सोडले आहे. आपला देश स्वतंत्र झाल्याचे पाहणे दुर्दैवाने माझ्या नशिबी दिसत नाही पण तुम्ही मात्र तुमच्या हयातीत स्वातंत्र्याची फळे नक्की चाखू शकाल असा मला विश्वास वाटतो.''

## शांतीकाननमधला तपस्वी

शरीराची फारशी साथ नसताना, नव्हे शरीर व्याधींनी जर्जर झालेले असतानाही आपल्या आयुष्याची शेवटची वर्षे फकीरमोहनांनी बालासोर येथल्या आपल्या घरात एखाद्या ऋषीप्रमाणे निसर्गाशी रममाण होऊन, प्रसंगी समाजाशी संवाद साधत आनंदात, तृप्ततेने घालवली. बालासोर येथल्या श्रीमती बेला घोष फकीरमोहनांबद्दल सांगताना लिहितात –

''माझ्या लहानपणाची गोष्ट आहे. मी त्या वेळी नऊ–दहा वर्षांची असेन. एकदा मी आईबरोबर कुणा एका गृहस्थांच्या घरी गेले होते. त्यांचे घर अगदी साधे, चार-चौघांसारखे होते. कुठल्याही आधुनिक सोयी तिथे नव्हत्या. पण त्या घराभोवती असलेली मोठ्ठी बाग पाहून मी अगदी हरखून गेले होते. त्या बागेत इतकी वेगवेगळी झाडे होती की बस्स! काही झाडे तर मी यापूर्वी कधीच पाहिली नव्हती. सुंदर, रंगीबेरंगी फुले असणारी झाडे तर तिथे होतीच पण त्यांच्या जोडीला काही दुर्मिळ वेली, औषधी वनस्पतीही मोठ्या निगुतीने वाढविलेल्या होत्या. सगळेच वातावरण कसे अद्भुत अन् भारून टाकणारे होते. माझे बालमन त्या रंगीबेरंगी फुलापानांमध्ये असे गुंतून गेलेले असतानाच एक असामान्य उंचीचे, कृश गृहस्थ हळूहळू आमच्याकडे येताना मी पाहिले. ते येऊन आमच्यासमोर उभे राहिले तेव्हा मला वाटले, आजूबाजूच्या खुज्या झुडपांमधून मानवतेचा एखादा उंचापुरा वृक्षच माझ्यासमोर उभा ठाकला आहे. त्या माणसाच्या व्यक्तिमत्त्वात आणि आजूबाजूच्या निसर्गात एक विलक्षण तादात्म्य होते. पहाटेच्या वेळी धरतीमाता जशी विलक्षण दिसते तसे ते दिसत होते. त्यांच्या विशाल भालप्रदेशावर अदृश्य अक्षरात कोरलेल्या आध्यात्मिक आकांक्षा स्पष्ट वाचता येत होत्या. त्यांच्याशी गप्पागोष्टी करण्यात मला वेगळाच आनंद लाभत होता. ते आम्हाला बागेच्या कानाकोपऱ्यात घेऊन गेले. प्रत्येक झाडाचे नाव, ते कुठे आढळते,



आपण ते कसे मिळवले, त्याचे औषधी गुण किंवा इतर गुण काय आहेत याची सविस्तर माहिती त्यांनी आम्हाला न कंटाळता अतिशय उत्साहाने दिली. नंतर आम्ही त्यांच्या घरात गेलो. बराच काळ ते एकटेच बोलत होते. ते नक्की काय बोलत होते ते आज इतक्या वर्षांनंतर मला नीटसे आठवत नाही, पण परतताना मी जेव्हा त्यांचा आशीर्वाद घेण्यासाठी त्यांच्या पायाशी वाकले; तेव्हा त्यांनी उच्चारलेले शब्द आजही माझ्या स्मरणात पक्के आहे. ते म्हणाले, ''छोटी आई, आपली मातृभाषा अन् मातृभूमी यांना जाणून घेण्याचा सदैव प्रयत्न कर!'' घरी परत जाताना आईकडून मला कळले की, ते गृहस्थ 'फकीरमोहन सेनापती' होते.

बालासोरच्या शांतीकाननचा हा ऋषितुल्य लेखक 14 जून 1918 ला हे जग सोडून गेला. ओरिया लोकांच्या नजरेत आजही शांतीकाननची ही भग्न वास्तू एखाद्या तीर्थस्थलासारखी पवित्र आहे. राष्ट्रीय एकात्मतेच्या नावाने गळे काढणाऱ्या भारतीय बांधवांनी एकवार शांतीकाननला भेट देऊन तिथले फकीरमोहन प्रार्थना करीत असत ते दालन अवश्य पाहावे. माणुसकीलाच धर्म मानून, त्यांचे पालन करणारा हा तपस्वी ज्या दालनात रोज प्रार्थना करत असे त्या दालनाच्या चारही भिंतींवर जगातील यच्चयावत् धर्मांमधली वचने कोरलेली आहेत. एका अर्धशिक्षित, घरातून–शाळेतून काढून टाकलेल्या मुलाने आयुष्यात केलेल्या वाटचालीचे तेच श्रेय म्हणावे लागेल. फकीरमोहनांचे आयुष्य म्हणजे माणसातील सद्‌गुण आणि त्याच्या क्षमता यांचे चालतेबोलते उदाहरण आहे असे म्हणायला हरकत नाही. आधुनिकतेचा स्पर्शही न झालेल्या मध्ययुगीन काळात अन् वातावरणात जन्मलेला व वाढलेला हा माणूस त्याच्या आधुनिक विचारांनी अन् दृष्टिकोनांनी आपल्या काळातील 'अत्याधुनिक व्यक्ती' ठरला होता. दारिद्र्यात जन्मलेला, अस्तित्वासाठी पावलोपावली झगडा करावा लागलेला, बेकारीत कुचंबणा, मानहानी सहन करत जगलेला हा माणूस स्वभावात कुठलीही कटुता न येऊ देता उत्तरकालात एक उदार मनाचा अन् थोर दातृत्व असलेला माणूस म्हणून ओळखला जाऊ लागला होता. अशा परिस्थितीत येऊ शकणाऱ्या मनाच्या क्षुद्रतेवर मात करून तो सहजी वर उठला होता. भ्रष्टाचाराने ग्रासलेल्या वातावरणात त्याने आपल्या जबाबदाऱ्या अतिशय सचोटीने आणि एकनिष्ठेने व विवेकीपणाने पार पाडल्या होत्या. आयुष्याची सुरुवात अर्धशिक्षित, गरीब मुलगा म्हणून केलेल्या फकीरमोहनांनी पुढे मोठ्या कष्टाने मोठी इस्टेट केली होती. आपल्या मागे ते भरपूर मालमत्ता आणि बागबगीचे सोडून गेले होते. सगळे मानसन्मान त्यांनी मिळवले होते. त्यांच्याबाबतीत आश्चर्य वाटणारी ही गोष्ट आहे की, 'सिन्ड्रेला'सारख्या कमनशिबी असलेल्या या अल्पशिक्षित मुलाने आपल्या भाषेत समृद्धीचे एक नवे युग सुरू केले होते व ते आजही त्यांच्या भाषेच्या इतिहासात 'आधुनिक' समजले जाते. हॅन्स अँडरसनच्या 'कुरूप बदकाच्या पिला'च्या (Ugly Duckling) गोष्टीची किंवा

कुरूप अळीच्या कोशातून बाहेर पडणाऱ्या रंगीत फुलपाखराची गोष्ट इथे आपल्याला आठवते. बालासोरच्या समुद्रतटावर छोटा हमाल म्हणून आयुष्याची सुरुवात करणाऱ्या मुलामध्ये झालेला हा विलक्षण बदल स्तिमित करणारा आहे. त्याने आपल्या भाषेला, साहित्याला अन् राष्ट्रीय चेतनेला दिलेले नवजीवन, नवरूपही तितकेच थक्क करणारे आहे.

******